# चैत्रपालवी

शिरीष अत्रे



प्रकाशन क्र. ८१

★

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुंबअी ४

मूल्य अडीच रुपये.

# आशीर्वाद

'चैत्रपालवी' हा माझ्या मुलीनें लिहिलेल्या अकरा गोष्टींचा संग्रह आहे. बहुतेक गोष्टी 'नवयुग' मधून पूर्वी प्रसिद्ध झाल्या आहेत. प्रकाशित होत असलेलें हें तिचें पहिलेंच पुस्तक असल्यानें वाचकांच्या हातीं तें ठेवण्यापूर्वी तिनें माझा 'आशीर्वाद' मागावा हें अुचितच आहे. मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रांत प्रवेश करण्याची अिच्छा माझ्या मुलीला व्हावी यांत नवल नाहीं. वाङ्मयाच्या वातावरणांत तिचा जन्म झाला आणि वाङ्मयीन वर्दळींतच ती वाढली. वयाच्या दुसऱ्या वर्षापासून ती मराठी साहित्यसंमेलनांना हजर रहाते आहे. मोठमोठ्या साहित्यिकांचा अन् तिचा अगदीं लहानपणापासून संबंध आला आहे. त्यांपैकीं अनेकांच्या अंगाखांद्यांवर ती खेळली आहे अन् कित्येकांच्या पाठीचे ओरखाडेही पण तिनें काढले आहेत. वाचावयाला यावयाच्या आधींपासून मोठमोठीं मराठी पुस्तकें हाताळण्याचा (अन् फाडण्याचा) तिच्या हाताला सराव आहे. कळूं लागायच्या आधींपासून मराठी वाङ्मयांतले मोठमोठे वाद तिनें अैकले आहेत. वयाच्या चवथ्या वर्षापासून ती माझीं नाटकें पहाते आहे. 'साष्टांग नमस्कार' नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला न हंसणारी प्रेक्षक ती अेकटीच होती. गेल्या पंधरा-सोळा वर्षांतल्या अनेक वाङ्मयीन व्यक्तींचे अन् घडामोडींचे तिच्या मनावर आणि जीवनावर अितके विविध संस्कार झालेले आहेत कीं, ती लेखनाच्या व्यवसायाकडे न वळली असती तरच नवल! आतां तिनें लिहावयाला नेमकी कधीं सुरुवात केली हें मला सांगतां येणार नाहीं. कारण तें रहस्य तिनें पुष्कळ दिवसपर्यंत माझ्यापासून लपवून ठेवलें. शाळेच्या का कॉलेजच्या मासिकांत तिच्या कांहीं स्फुट कविता आणि लेख जेव्हां मला वाचावयाला मिळाले, तेव्हांच ती गोष्ट मला कळाली आणि वाचतां क्षणींच भाषेचा प्रसाद आणि शैली हे गुण तिच्या लेखनांत आहेत हें माझ्या ध्यानीं आलें. वळणदार भाषा लिहिण्यास लेखकाला किती तरी कष्ट करावे लागतात. वर्षानुवर्षें त्याला पुस्त्या गिरवाव्या लागतात; पण अितरांना श्रमानें साध्य होणारी ही गोष्ट तिच्यांत सहजगत्याच प्रकट झालेली मला दिसून आली. तिच्या त्या वयाला मला स्वतःला कांहीं अितकें चांगलें लिहितां येत

नव्हतें हें खचित. माझ्या भाषेची घडण तयार व्हावयाला पुष्कळ वर्षें लागलीं. तिच्या भाषेचें आणखी एक वैशिष्ट्य मला जें आढळून आलें तें हें कीं, कोणाच्याही अनुकरणाची तिच्यावर छाया नव्हती. फार कठीण गोष्ट आहे ही. बहुतेक नव्या लेखकावर कोणा ना कोणाची तरी सावली ही पडलेलीच असते. माझ्या लेखनाच्या वातावरणांत वाढूनही तिनें आपल्या स्वतःच्या भाषेला माझ्या शैलीचा अुपसर्ग लागूं दिलेला नाहीं. बऱ्याच वर्षांपूर्वी प्रा. माटे यांच्या आग्रहावरून तिनें पुण्यांतल्या अेका मासिकाच्या 'दिवाळी अंकांत' माझें स्वतःचें अेक शब्दचित्र रेखाटलेलें कित्येकांच्या स्मरणांत असेल. मी तो लेख वाचून चकितच झालों. तिच्या वाङ्मयीन प्रतिभेचे अनेक पैलू त्या लेखांत ओजस्वितेनें प्रकट झालेले आढळून येतील. अितक्या लहान वयांत असें हृदयस्पर्शी लिखाण केल्याचीं फारच थोडीं अुदाहरणें सांपडतील. तथापि, लघुकथेच्या क्षेत्रांत ती पाअूल टाकील अशी मात्र माझी कल्पना नव्हती. कविता करण्याचें तिनें आतां सोडूनच दिलें आहे. गेलीं तीन-चार वर्षें ती नुसत्या लघुकथाच लिहिते आहे. त्यांपैकीं कांहीं निवडक गोष्टीच तिनें या संग्रहांत समाविष्ट केलेल्या आहेत. तिच्या गोष्टी चांगल्या आहेत का वाअीट आहेत हा प्रश्न अलाहिदा. तें ज्याचें त्यानें वाचूनच ठरवावें. मी मुद्दामच त्या संबंधीं बोलत नाहीं; पण अेक गोष्ट मात्र निर्विवाद आहे. ती अिथें सांगावयाला हवी. तिच्या भाषेप्रमाणेंच तिच्या गोष्टींवर कोणाच्याही अनुकरणाची छाप मात्र पडलेली नाहीं. आपल्या गोष्टींमधल्या विषयांची नि व्यक्तींची निवड स्वतंत्र बुद्धीनेंच तिनें केलेली आहे. आजकाल सर्वसामान्य कथालेखक गोष्टींसाठीं जें विषय निवडतात आणि त्यांमध्यें जो रस निर्माण करतात त्यापेक्षां कांहीं तरी निराळीं दृश्यें दाखवून निराळ्या भावना निर्माण करण्याचा तिनें प्रयत्न केलेला आहे. तिची पहिलीच गोष्ट 'मीरा' ही पहा. क्षयासारख्याच एखाद्या असाध्य रोगानें आजारी असलेल्या अेका बुद्धिमान् अन् तेजस्वी मुलीचें विलक्षण हृदयस्पर्शी शब्दचित्र तिनें त्या गोष्टींत वाचकांच्या डोळ्यांपुढें अुभें केलें आहे. मानवी जीवन हें मोठें क्रूर आहे. त्याला दयामाया नाहीं. हातांत अमृताचा प्याला असतांनाही तो त्याच्या ओंठाला लागत नाहीं. अुलट त्याकडे पहात पहात त्याला मरावें लागतें. बरें, ह्याबद्दल दोष कोणाला द्यावयाचा हेंही समजत नाहीं. भीषण नियतीच्या सूत्रांनीं जखडून सर्वस्वीं असहाय झालेला मानव हा खराखुरा शोकनाट्याचा विषय आहे. या शोक-

नाट्याचें चित्रण माझ्या मुलीनें आपल्या पुष्कळशा गोष्टींत केलेलें आढळून येतें. हें तिनें हेतुपूर्वक केलें असेल असें मला वाटत नाहीं; पण मराठी लेखकांत सहसा न आढळून येणारें हें बीज सहजगत्या तिच्या प्रतिभेंत निर्माण झालेलें आहे. 'कष्टाचें फळ मिळतें', 'बदला' आणि 'न अुघडलेल्या खिडक्या' या तीन गोष्टी तर ह्या भीषण नाट्याचे अुत्कृष्टच नमुने आहेत. सबंध जन्म गुराप्रमाणें कष्ट अुपसणारी अन् शेवटीं अेक दिवस कुत्र्याप्रमाणें रस्त्यावर चिरडून मरणारी स्वयंपाकीण जानकीबाअी, कुरूपतेमुळें आयुष्यांतल्या सर्व आकांक्षा मातीमोल होअून अखेर अंगावर घासलेट तेल ओतून आत्महत्या करणारी रंगू, आयुष्यांतल्या आकांक्षा असफळ राहिल्यामुळें जीवनावर मनस्वी चिडलेलीं अन् अेकमेकांचा द्वेष करूनही पुन्हा अेकत्रच राहणारीं अविवाहित भाअू नि बहीण हे जीवनांतील विपरीत अन् निर्दय नाट्याचे अत्यंत हृदयभेदक नमुने होत. या भीषण नाट्याचा अनुभव सामाजिक परिस्थिती-मधून होत नसून तो अपरिवर्तनीय अशा मानवी स्वभावांमधून होत असतो हें त्याचें वैशिष्ट्य आहे. मीरा, जानकीबाअी, रंगू, गोविंदराव अन् माअी ह्यांचा जन्म कोणत्याही समाजांत वा परिस्थितींत झाला असता तरी त्यांना आपली भीषण नियति टाळतां आली नसती. यांतून निर्माण होणाऱ्या रसाला करुण रस म्हणतां येणार नाहीं. करुण रस हा दुसऱ्याला होणाऱ्या दुःखाच्या अन् यातनेच्या सहानुभूतीमधून होतो आणि त्याचें प्रकटन मुख्यत्वेंकरून अश्रूंच्या द्वारा होतें. मीरा, जानकीबाअी, रंगू, गोविंदराव नि माअी ह्यांचें दुर्दैवी जीवन बघून रडूं येत नाहीं. दया किंवा अनुकंपाही वाटत नाहीं; पण अेकंदर जीवनाबद्दल भय वाटूं लागतें. सुखदुःखाची वांटणी नियतीनें अशा अन्यायी आणि विषम रीतीनें कां करावी याची चीड अुत्पन्न होते. मीराला अैन तारुण्यांत असाध्य रोग जडला ह्याला अिलाज काय? समाजांत केवळ कष्ट करून मरावयालाच जानकीबाअीसारखीं शेंकडों बुद्धिशून्य अन् भावना-शून्य माणसें जन्माला येतात याला कोण काय करणार? कुरूप चेहऱ्यामुळें मृत्यूखेरीज रंगूला दुसरें भवितव्यच अुरत नाहीं, ह्यावर अुपाय काय?

'जीवन हें असेंच आहे!' असें संतापून स्वतःच स्वतःला सांगावयाचें अन् स्वस्थ बसावयाचें, दुसरें काय? ज्या दुःखावर किंवा यातनांवर अुपाय आहे त्यां-मधून शोकनाट्य निर्माण होत नाहीं. अुदाहरणार्थ, वैधव्य, व्यसन, सामाजिक अन्याय वा विषमता. मनुष्याला असहाय्य करणारीं कांहीं हीं संकटें नाहींत.

प्रत्येकावर अिलाज आहे; पण मानवी शरीराच्या किंवा स्वभावाच्या विशिष्ट व्यंगामुळें, व्याधीमुळें वा दुरतिक्रमतेमुळें जीवनांत जी असहायता अुत्पन्न होते, तिच्यामधून बाहेर पडण्याचा मुळीं मार्गच सांपडत नाहीं अन् त्यामुळें भावनांचा जो भयानक कोंडमारा होतो त्यांतून शोकनाट्य निर्माण होतें. शेक्सपिअर अन् अर्न्स्ट टोल ह्यांच्या दुःखान्त नाटकांमध्यें हें शोकनाट्य विलक्षण भव्य स्वरूपांत आढळून येतें. ह्या नाटककारांच्या नाटकांच्या परिशीलनानें माझ्या मुलीला शोकनाट्याचें अेवढें आकर्षण वाटूं लागलें आहे किंवा काय न कळे. पण सर्वसामान्यॆंकरून अितर मराठी कथालेखकांत सहसा न आढळून येणारें हें तिच्या लेखनाचें वैशिष्ट्य आहे असें मला वाटतें. ‘ टळलेली वेळ ’, ‘ पराभव ’, ‘ पतिधर्म ’ आणि “ विस्कटलेली घडी ’ ह्या गोष्टींतही स्त्री-जीवनाचें अन् विशेषतः स्त्रीमनाचें अत्यंत वास्तववादी अन् हृदयभेदक चित्रण केलेलें आढळून येअील. सर्वच गोष्टींमधील व्यक्तींचीं, भावनांचीं अन् प्रसंगांचीं वर्णनें सोप्या नि रसपूर्ण भाषेंत अत्यंत हळुवारपणें करण्यांत प्रकट झालेलें तिचें कौशल्य वाखाणण्यासारखें आहे. “ सगळा आधार तुटल्यामुळें गिरक्या घेत घेत खालीं येणाऱ्या सुकलेल्या पानासारखी तिची अवस्था झाली होती.” “ आपल्या कल्पना ती वाऱ्यावर सोडून देई अन् हवेंत अुडणाऱ्या म्हाताऱ्या गोळा करणाऱ्या लहान मुलाप्रमाणें मी त्या पकडत बसे.” “ आपल्या खरखरीत हातावर खोबरेल तेल घेअून वहिनीची गोरी गोरी पाठ लालबुंद होअीपर्यंत चोळतांना तिच्या हातावर रुअीचा कापूस फुलून येअी जणूं.” “ जीवनाचें रिकामें पात्र घेअून त्या आज चाळिशीच्या अुंबरठ्यावर अुभ्या होत्या.” “ फुलत असलेल्या मदनबाणाच्या कळीभोंवतीं जसा गंध दरवळावा तसें तिचें यौवन तिच्याभोंवतीं तरळत होतें.” “ हलक्या हातानें त्यांनीं संसाराची अिमारत हळूहळू बांधली होती; पण अखेर तिला मला मोठा तडा जायचा तो गेलाच! ” हे तिच्या हळुवार लेखनशैलीचे कांहीं वैशिष्ट्यपूर्ण नमुने आहेत. स्वयंपाकीण जानकीबाअी तरुण प्रणयाचें दृश्य भावनाशून्य नजरेनें बघते, त्या प्रसंगाचें “ अेखादें मांजर समोरून जावें आणि त्याकडे निर्विकार मुद्रेनें बघावें तशी ती या साऱ्या खेळाकडे बघत होती. ” हें वर्णन किंवा लग्न झाल्यामुळें आपल्या अविवाहित मैत्रिणींकडे तुच्छतेनें अन् तिरस्कारानें बघणाऱ्या शालिनीला “ विमलची हंसतांना हिरड्यांसकट अुठून दिसणारी बत्तिशी दिसावी, कमीच्या तोंडावरच्या पुटकळ्या भयंकर वाटाव्या अन्

शशीचा किनरा आवाज अत्यंत कर्कश वाटावा" हें वर्णन लेखिकेच्या तरल अन् मार्मिक अवलोकनाचें निदर्शक आहे. 'वर्षा राणी' आणि 'प्रायश्चित्त' ह्या दोन गोष्टींची रचना अितर गोष्टींच्या मानानें विस्कळित अन् कृत्रिम वाटते. असो. प्रयत्नानें आणि अभ्यासानें कोणत्याही लेखकाच्या भाषेचें आणि प्रतिभेचें वैशिष्ट्य अधिक तेजस्वी अन् प्रभावी बनत जातें; पण त्याला लेखकाजवळ मूळ भांडवल कांहीं तरी असावें लागतें अन् तेवढें माझ्या मुलीजवळ आहे अेवढा जरी विश्वास ह्या कथासंग्रहाच्या वाचनानें वाचकाच्या मनांत निर्माण केला तरी पुष्कळच आहे. वाङ्मयाच्या अुंबरठ्यावर 'चैत्रपालवी'चा संभार घेअून अुभ्या असलेल्या माझ्या मुलीच्या नवपल्लवित प्रतिभेला रसिकांना लुब्धविणारा सुवासिक आणि रसदार मोहर लवकरच यावा, असा जर पितृप्रेमानें मीं आशीर्वाद दिला तर अुदार वाचक त्याकडे समजुतीच्या अन् सहानुभूतीच्या दृष्टीनें पहातील अशी मला आशा आहे.

मुंबअी, १३ जुलै १९५२.

— प्रल्हाद केशव अत्रे

# आमचें तेजस्वी मराठी प्रकाशन

**स्वा. वि. दा. सावरकर**

| | |
|---|---|
| १८५७ चें स्वातंत्र्यसमर | १२–८ |
| हिन्दुत्व | २–८ |
| हिन्दुराष्ट्रदर्शन | ६–० |
| हिन्दुत्वाचे पंचप्राण | ३–० |
| हिन्दुपदपादशाही | ५–० |
| तेजस्वी तारे | २–० |
| रणशिंग | ३–० |
| सिंहगड | ०–८ |
| बाजीप्रभु | ०–८ |
| चाफेकर-रानडे | ०–६ |
| नागरी लिपिशुद्धीचें आन्दोलन | २–८ |

**शि. ल. करंदीकर**

| | |
|---|---|
| सावरकरांचे सहकारी | १–८ |

**डॉ. वि. म. भट**

| | |
|---|---|
| अभिनव भारत | ४–० |

**भा. कृ. केळकर**

| | |
|---|---|
| सावरकरदर्शन | ६–० |

**वि. वा. हडप**

| | |
|---|---|
| भारतमाते ऊठ | ३–० |
| भारतमातेची हांक | ३–० |
| भारतमातेचा शाप | ३–० |
| भारतमाता वनवासी | ३–० |
| भारतमातेचें दिव्य | ३–० |
| भारतमाताकी जय | ३–० |
| सिंहाचे छावे | ३–० |
| बापलेक | ३–० |
| कॉंग्रेसचा कल्पवृक्ष | १–८ |

**आचार्य अत्रे**

| | |
|---|---|
| हंशा आणि टाळ्या | ५–० |
| पत्रकार अत्रे | ३–० |

**शिरीष अत्रे**

| | |
|---|---|
| चैत्रपालवी | २–८ |

**ना. सी. फडके**

| | |
|---|---|
| अुजाडलं ! पण सूर्य कुठें आहे ? | ५–० |
| प्रीतिपुष्प | २–८ |

**र. गो. सरदेसाअी**

| | |
|---|---|
| आमचा संसार | २–८ |

**भा. वि. नाडकर्णी**

| | |
|---|---|
| राजाराणी | २–० |

**पिरोज आनंदकर**

| | |
|---|---|
| बाळ बहिर्जी | २–० |

**बा. वा. फाटक**

| | |
|---|---|
| मुंबअीचे मानकरी | २–० |

**केशवराव भोळे** ( अेकलव्य )

| | |
|---|---|
| संगीताचे मानकरी | २–८ |

**वि. वि. बोकील**

| | |
|---|---|
| गांठभेट | १–८ |

**सौ. अनसूयाबाअी कामत**

| | |
|---|---|
| स्वयंपाकाचे कांहीं प्रकार | २–८ |
| आमची विलायतला प्रथमभेट | ४–० |

**प्रि. मो. वा. दोंदे**

| | |
|---|---|
| वनविहार | १–४ |

**संजीवनी मराठे**

| | |
|---|---|
| भावपुष्प | १–८ |

**वसुंधरा पटवर्धन**

| | |
|---|---|
| संसारशोभा | २–० |

**सौ. जोशी**

| | |
|---|---|
| सुशिक्षित सासुरवास | ०–८ |

**मामा वरेरकर**

| | |
|---|---|
| माझा नाटकी संसार, खं. २ | ३–० |
| द्वारकेचा राजा | १–८ |

**मा. आ. कामत**

शककर्त्याचा न्याय १–८

**कै. न. दा. सरपोतदार**

चंद्रराव मोरे १–८

**ग. कृ. बोडस**

भगवा झेंडा १–८

पूज्य गांधीजी १–४

अटकेपार १–८

वासुदेव बळवन्त १–८

छत्रपतीचा छावा ०–८

महावीर कर्ण ०–८

राणा प्रताप ०–८

**कै. वि. ह. औंधकर**

आग्ऱ्याहून सुटका २–०

बेबंदशाही २–०

**स. अ. शुक्ल**

लोकसिंहासन १–८

वीर अभिमन्यु ०–८

जयद्रथवध ०–८

**नानासाहेब गोखले**

सेनापति तात्या टोपे ०–८

**वि. ना. कोठीवाले**

जय मल्हार १–८

**ग. पां. परचुरे**

जातिवन्त जवान १–४

**ह. वि. देसाई**

दोन लग्नें ०–१२

**मधुकर राव**

लक्षाधीश १–४

**सौ. बेडेकर**

पारध १–४

**कै. श्री. कृ. ओक**

सिंहगर्जना १–०

**वि. ग. धारप**

पुढचें पाऊल १–४

**के. पां. परांजपे**

शेजारीपाजारी १–८

**शां. गो. गुप्ते**

झुंझार झांशीवाली ०–८

**मामा दुगल**

प्रेमगीतें ०–६

**बा. अ. देसाई**

झुंझार महाराष्ट्र ०–८

**गो. वि. जोगळेकर**

कबुतराची कथा ०–६

**ह. रा. महाजनी**

ईश्वराची आत्महत्या ३–०

**वि. रा. हंबर्डे**

सन १८५७ (झांशीची राणी) १–८

**नाना कोचरेकर**

मानी मराठा १–८

**अनुभवी प्राध्यापक**

प्राचीन मराठी वाङ्मयसाहाय्यक १–४

**का. म. देव**

कामदेवाच्या कथा १–८

**ग. बा. ओक**

कुंडलीरहस्यदर्पण ३–०

**शालेय**

महाराष्ट्राच्या गोड गोष्टी ०-१०

# अनुक्रमाणिका

# मीरा : : १

तसा माझा स्वभाव कांहीं फार धाडसी नाहीं. अेकदम कुठलीहि नवीन गोष्ट करतांना मी जरा घाबरतेंच. क्वचित् भिअून माघारहि घेतें आणि घरांतील माणसांना न आवडेल असें करण्याचें तर माझ्या मनांत फार थोड्या वेळां येतें. थोडक्यांत म्हणजे मी आपली अेक सरळमार्गी, पापभीरू मुलगी आहे. आपण बरें, कीं आपलें काम बरें अशी माझी वृत्ति आहे. माझ्या ह्या साध्या जीवनांतच मला समाधान आहे, मग कोणी कांहींहि म्हणो ! कधींहि तऱ्हेवाअीकपणें वागलेलें मला स्वतःला स्मरत नाहीं. माझ्या हातून अशी कांहीं वर्तणूक घडेल असेंहि मला वाटत नाहीं.

परंतु अेकदांच ; अेकदांच मी नेहमींचा सरळ मार्ग सोडून बाजूच्या अेका वाटेकडे कुतूहलानें वळलें होतें. मी तशी कां वागलें हें मला अजूनहि आकलत नाहीं. मीं तसें वागायला हवें होतें, कीं माझें चुकलें हेंहि मला सांगतां येत नाहीं. माझ्या आअीला, आमच्या नानांना, घरांतल्या सगळया मंडळींना जर तें कळलें तर तीं सर्व जण काय म्हणतील ह्याची भीति अजूनहि मला डांचते ; परंतु केलेलें कांहीं बदलतां येत नाहीं. बोललेलें कांहीं फिरवतां येत नाहीं. झालें तें झालें खरें ! त्याबद्दल मला आनंदहि होत नाहीं कीं पश्चात्तापहि वाटत नाहीं. मीं जें केलें तें केवळ अेक धाडस म्हणूनच केलें. दररोजच्या ठराविक जीवनांत कांहीं तरी बदल म्हणूनच केलें. मलाहि कांहीं लोकांवेगळें करतां येतें का हें पहावें म्हणूनच केलें. कोणाला वाटेल, कीं काय केलें हें सांगण्याअैवजीं ही अुगाच निरर्थक शब्द अुगाळीत काय बसली आहे ! कोणाला तसें वाटूं नये म्हणून आतां मीं काय केलें तें सांगतेंच.

माझा नेहमींचाच क्रम आहे कीं, सकाळीं वर्तमानपत्र आल्यावर लगेच तें भराभर वाचून न काढतां केवळ महत्त्वाच्या मथळयांवरून नजर फिरवावयाची अन् मग रात्रीं झोंपण्याच्या आधीं घरांतलीं सगळीं वर्तमानपत्रें गोळा करून सावकाशीनें तीं नीट वाचून काढावयाचीं. मग त्यांतील जाहिराती, बारीक-सारीक बातम्या, त्रोटक वृत्तें, महत्त्वाचे लेख, अग्रलेख; सारें सारें मी अक्षरशः वाचून काढतें. अेकदां सगळीं पत्रें काळजीपूर्वक वाचून झालीं म्हणजेच मला चांगली झोंप येते. त्या दिवशींहि मी नेहमींच्या संवयीप्रमाणें झोंपण्यापूर्वी सगळीं वृत्तपत्रें पुढ्यांत घेअून पलंगावर वाचीत बसले होतें; ‘ पाहिजे ’ ह्या सदराखालील करमणूक करणाऱ्या जाहिराती मी वाचीत होतें, अितक्यांत अेका बारक्याशा जाहिरातीनें माझें मन वेधून घेतलें. ती पुढीलप्रमाणें होती: “ अेका आजारी स्त्रीसाठीं दुपारीं सोबत म्हणून अेक सुशिक्षित, चांगल्या विचारांची तरुण मुलगी पाहिजे. दुपारीं वाचन, पत्ते खेळणें ह्यांसारखीं किरकोळ कामें करावीं लागतील. मात्र ही मुलगी सशक्त व दिसण्यांत चलाख असली पाहिजे. कामाचा मोबदला व्यक्तीच्या मागणीप्रमाणें मिळेल. खालील पत्त्यावर भेटा. ” आणि नंतर पत्ता दिला होता. गांवाबाहेरील अेका मोठ्या कमी रहदारीच्या रस्त्यावरील प्रशस्त बंगल्यांत ही आजारी स्त्री रहात असावी असें तो पत्ता वाचून मला वाटलें. बहुतेक अेखाद्या श्रीमंत स्त्रीचे हे चोंचले असावेत अशी माझी खात्री पटली. अितक्या लांब रहात असल्यामुळें गांवाशीं हिचा संबंध नसेल आणि म्हणूनच दुपारीं करमणूक व्हावी ह्यासाठीं तिनें हा मार्ग पत्करला असेल असा मीं कयास बांधला. गंमत करून बघूं या का असा अेक विचारहि माझ्या मनांत डोकावला. ‘ छेः भलतेंच काय ? ’ असें म्हणून मीं त्याला आवरण्याचा बराच प्रयत्न केला; परंतु वारंवार माझी नजर त्या जाहिरातीकडेच जाअी. शेवटीं ती मला अगदीं पाठ होअून गेली. तो बंगलाहि माझ्या डोळयांसमोर अुभा राहूं लागला. शेवटीं माझें मन अितकें अस्वस्थ झालें कीं, हातांतील वर्तमानपत्रहि गळून पडलें आणि तो धाडशी विचार अेकसारखा मला गुदगुल्या करूं लागला.

शेवटीं दिवा विझवून मी झोंपलें देखील; पण मध्यरात्रीं मला अचानक जाग आली ती त्या विचारानेंच. अखेर मीं निश्चय केला आणि घरांत कुणालाहि कळूं न देतां तें साहस करून पहाण्याचें ठरविलें. नाहीं तरी सध्यां

कॉलेजच्या सुट्टीचेच दिवस आहेत. तेवढाच वेळहि जाईल आणि पैशापरी पैसाहि मिळेल असा विचार करून मीं दुसऱ्या दिवशीं त्या बंगल्याचा पत्ता काढण्याचें ठरविलें. पैशाच्या मोहानें मला अधिक ओढलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मीं आईला म्हटलें, "आऔ ग, आज दुपारीं मी सुलूकडे जाऊं का? ती मला नवीन प्रकारचा कशिदा शिकवणार होती!" विळीवर कांदा चिरतां चिरतां आऔ म्हणाली, "जा कीं. सुट्टींत तेवढंच शिकून घे!" मी मनांतल्या मनांत हंसलें व म्हटलें, "बिचारी आऔ!" दुपारीं नीटनेटकी वेषभूषा करून मी घराबाहेर पडलें, ती चव्हाण सायकल-वाल्याच्या दुकानावर गेलें. अेक चांगलीशी सायकल बघून घेतली आणि जी भरधांव निघालें ती थेट गांवाबाहेरील नदीचा पूल ओलांडून जाहिरातींत दिलेल्या रस्त्याला लागलें. हळूहळू अेकेक बंगला बघतां बघतां मी अेका सुंदर पिवळा रंग दिलेल्या अद्ययावत् पद्धतीच्या बंगल्यापुढें आलें. 'हं, हाच तो बंगला बरं का!' त्याच्यावरील नांव वाचून मीं म्हटलें. दार अुघडून बाहेर पडत असलेल्या मोलकरणीला माझें काम सांगतांच ती मला लगबग आंत घेअून गेली. त्या वेळीं माझा धीर अितका सुटला होता कीं, बागेचें, व्हरांड्याचें, दिवाणखान्याचें मामुली निरीक्षणहि माझ्या हातून झालें नाहीं. अेखादे वेळीं कोणी ओळखीचें असलें तर, मला रागावून कोणीं घालविलें तर, मी अेकंदम नापसंत पडलें तर, असले हजारों 'तर' अेकदम घोंघावत आले माझ्या भोंवतीं! दिवाणखान्याला लागून असलेल्या डाव्या खोलीकडे त्या बाअीनें मला नेलें व आंत जा म्हणून सांगून ती भरकन् निघून सुद्धां गेली. मीं शक्यतों चलाख दिसण्याचा प्रयत्न करीत पांढरा झुळझुळीत पडदा वर केला आणि शक्यतों सुशिक्षित मार्दव आवाजांत आणून म्हटलें, "येअूं का?"

आरामखुर्चीवर वाचीत बसलेल्या अेका कठोर चेहऱ्याच्या वयस्कर स्त्रीनें विचारलें, "कोण पाहिजे?" "मी तुमची वर्तमानपत्रांतील जाहिरात वाचून आलें आहे," मीं म्हटलें. "असं असं होय? या ना आंत!" तिच्या चेहऱ्यावर अेकदम मृदु हास्य तरंगलें. मला जवळच्या खुर्चीवर बसायला सांगून ती माझ्याबद्दल चौकशी करूं लागली. माझ्या अुत्तरांनीं तिचें समाधान झालें असें तिच्या चेहऱ्यावरून वाटलें. बराच वेळ स्तब्ध राहून ती म्हणाली, "मग सध्यां तरी तुम्हांला दुपारीं यायला अडचण नाहीं म्हणायची. आमचे

तरी अिथें रहायचें कुठें निश्चित आहे; पण तुम्ही आलांत तर हरकत नाहीं आमची!"

मीं किंचित् चांचरत म्हटलें, "पण तुम्हांला दुसरं कोणी मिळणार असेल..."

ती हंसत बोलली. "अहो, कोणीहि चालेल. अितक्या दूर यायला कोण तयार आहे? तुमच्यासारख्या चांगल्या मुलीला गमवायला मी बरी तयार होअीन!" मग अर्धवट अुठत ती म्हणाली, "चला, तुम्हांला मीराकडे घेअून जातें. मीरालाच सोबत करायची आहे बरं का तुम्हांला. मी मीरेची आत्या. हा मीरेच्या मामांचा बंगला. अिथं सध्यां कुणी नसतं म्हणून आम्ही आलों आहोंत." बोलतां बोलतां आम्ही वरच्या मजल्यावरील अेका बाजूच्या खोलीकडे आलों देखील. किंचित् धडधडत्या अंतःकरणानेंच मी आत्याबाअी-मागून त्या खोलींत पाअूल टाकलें. "मीरा, तुझी नवी मैत्रीण बाघितलीस का?" समोरच पलंगावर पडलेल्या अेका मुलीला अुद्देशून त्या म्हणाल्या. त्याबरोबर तोंडापर्यंत ओढून घेतलेली पांढरी चादर खालीं सरकवून ती थोडीशी अुठून बसली. तिच्याकडे पहातांच फार तर सोळासतरा अितकेंच तिचें वय असावें असें मला वाटलें; परंतु जाहिरातींत तर 'आजारी स्त्री' असा तिचा अुल्लेख होता. तें आठवून मला आश्चर्यच वाटलें! पुढें मला कळलें कीं, मीरा पंचवीस वर्षांची होती; पण आजारामुळें ती कृश व लहानगी वाटे. मला पहातांच तिच्या त्या गोऱ्या पांढऱ्या अुभट चेहऱ्यावर हास्याची अस्फुट रेषा किंचित् अुमटली आणि तिच्या फिक्या गालांवर कुठल्या कुठें लुप्तहि झाली. तिचे लांबट मोठे डोळेहि किंचित् हंसल्याचा मला भास झाला. तिच्या वक्षःस्थलावरून थेट मांडीवर रुळत पडलेल्या भुऱ्या भुऱ्या केसांच्या दोन वेण्या तिनें मागें झटकल्या आणि मला अुद्देशून ती म्हणाली, "ये ना, अिथं पलंगाजवळ खुर्ची घेअून बैस!" मग आत्याला अुद्देशून ती म्हणाली, "अगदीं आपल्या नलूसारखी दिसते ही नाहीं? मला अेकदम वाटलं तूं नलूलाच घेअून आलीस कीं काय? पण आत्या, तूं जा अिथून, आम्ही गप्पा करतों."

आत्या निघून जातांच ती हलक्या स्वरांत म्हणाली, "कांहीं नको खुर्ची! अिथं पलंगावर माझ्या शेजारींच बैस. अुगीच्र आत्या रागवेल म्हणून मीं म्हटलं तसं मघां!" मग तिनें मला नांव विचारलें माझें. ती माझ्या

वेणीची सुटलेली फीत नीट बांधीत म्हणाली, "मी तुला 'नीरा' म्हणून हांक मारूं का? मीराची मैत्रीण नीरा नाहीं का? बरं झालं तूं आलीस तें. मला अगदीं कंटाळा आला आहे अेकटीला रहाण्याचा. मीं मनाशीं ठरवलंच होतं कीं, मला जर अिथं कुणी मैत्रीण मिळाली तर तिला नीरा म्हणायचं; अे, पण तूं काय शिकतेस वगैरे सांग ना मला. अे, तुझे केस आवडले हं मला. काळे काळेभोर आहेत अगदीं! माझे बघ कसेतरीच पिंगट रंगावर आहेत." ती जिभेवरील बंधनें सुटल्याप्रमाणें बडबडत होती. कोणी तरी जिव्हाळ्याचें माणूस बऱ्याच दिवसांनीं भेटल्यावर काय सांगूं नी काय नको असें होअून जातें अन् मग आपण अेकदम हजार गोष्टी बोलायला जातों; पण कुठलीच नीट सांगतां येत नाहीं. तसेंच कांहींसें वाटलें मला तिचें बोलणें अैकून.

स्वतःविषयीं जितकें सांगतां येअील तितकें सांगितलें मीं तिला. तळहातावर गाल टेकून ती कौतुकानें माझ्याकडे पहात होती आणि तन्मयतेनें सारें कांहीं अैकत होती. मग आम्ही आवडत्या पुस्तकांवर बोलूं लागलों. मग त्या पुस्तकांतील तत्त्वांवरून वाद करूं लागलों. तेवढ्या अवकाशांत आमची अगदीं चांगलीच गट्टी जमली. मग मीरा थोडी थकली. मांडीवर घेतलेली अुशी तिनें डोक्याखालीं घेतली व अेका कुशीवर रेलून ती बोलूं लागली. मग तिची बडबडहि थांबली व मी अेकटीच बोलूं लागलें. तिनें पाणी मागितलें. थोड्या वेळानें माझें बोलणें अैकतां अैकतां तिनें डोळे मिटले अन् अखेर ती झोंपींच गेली. अत्यन्त सुखाची झोंप लागल्याची प्रसन्नता तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट अुमटली होती. तिचे सुकलेले, कोमेजलेल्या पाकळींप्रमाणें दिसणारे लहानगे ओंठ अुगाच हालत होते. अंगावरून ढळलेली चादर मीं तिच्या गळ्यापर्यंत सरकवली, पलंगावरून खालीं लोंबत असलेला तिचा हडकुळा गोरा हात मीं तिच्या छातीवर नीट ठेवला आणि खुर्चीवर बसून तिचें निरीक्षण करूं लागलें. ती जर सशक्त असती तर सुरेखच दिसली असती असा विचार माझ्या मनांत आला. तिच्या गळ्याचीं हाडें जर अितकीं वर आलीं नसतीं तर तिची मान किती नाजुक दिसली असती असेंहि मला वाटलें. भिंतीवरील घड्याळांत पांचांचे ठोके पडले आणि मग मात्र मी अुठलें. आत्याबाई खालीं चहाच्या तयारींत होत्या. त्यांच्याबरोबर चहा घ्यायला मात्र मी थांबलें. "काय करतेय् मीरा?" त्यांनीं विचारलें. "छान झोंप

लागली आहे तिला!" मीं सांगितलें. "असं का? मग बरं झालं. आज आठवडाभर झोंप नाहीं म्हणून ती कुरकुरत होती. आतां तिच्या ह्या झोंपेचं पुण्य तुम्हांला बरं का!" मग किती तरी वेळ त्या तिच्याविषयीं बोलत राहिल्या. मी निघालें तेव्हां त्या म्हणाल्या, "तिच्यासाठीं कोणतीं पुस्तकं आणवूं?" "सध्यां राहूं दे, मीच घेऊन येअीन अुद्यां!"

अशा रीतीनें माझ्या आयुष्यांतील तो विचित्र क्रम सुरू झाला. घरांत कुणाला कल्पनाहि नव्हती माझ्या ह्या अुद्योगाची. सुलूच्या शेजारीं रहात असलेल्या राधाबाअींच्या शिवणकामाच्या वर्गाला मी जातें अशीच सगळयांची समजूत होती. माझ्या नशिबानें सुलू त्या वेळीं तिकडे नव्हती आणि माझें बिंग फुटलेंहि नाहीं. रोज दुपारीं मी नियमानें मीराकडे जाऊं लागलें. थोडा वेळ गप्पा कराव्या, मग चांगल्या चांगल्या कविता वाचून दाखवाव्यात, नाहीं तर गोष्टी वाचाव्यात किंवा थोडा वेळ पत्ते खेळावेत असा आमचा नेहमींचा क्रम होता. मीरा स्वतःच्या आयुष्याविषयीं फार थोडें बोले. जणुं त्या आजारपणाच्या आयुष्याखेरीज तिला दुसरें कुठलें जीवन कधींहि नव्हतें. तिच्या गतायुष्याचा अितिहास असा फार थोडा कळला मला. आत्याबाअींच्या बोलण्यावरून मला अेवढेंच कळलें होतें कीं, मीराचे आअी-वडील फार चांगले होते. वडील व्यापारी होते. त्यांचे सगळे नातेवाअीकहि व्यापारांतच पडले होते. अेकंदर तें सर्वच घराणें फार सधन होतें. मीराला बरींच भावंडें होतीं. तिला शिकण्याची फार आवड होती. अभ्यासाखेरीज गाणें, नृत्य, वादन अित्यादि अनेक कलांचें शिक्षण ती घेत होती. तिचें लग्नहि अेका श्रीमंत घराण्यांतील तरुणाशीं ठरलें होतें. शिक्षणक्रम संपल्यावर तें होणार होतें; परंतु मध्येंच मीराला बारीक ताप येऊं लागला. तिचें सारें अंग लुळें पडल्यासारखेंच झालें. डॉक्टरांनीं विश्रान्तीची गरज आहे म्हणून सांगितलें आणि त्यानंतर किती तरी अुपाय केले. तिला हवेच्या ठिकाणीं नेऊन ठेवलें; परंतु खंगत चाललेली मीरा बरी होअीना आणि आज आठ वर्षें ती अशी अंथरुणावर पडून होती. तिचा शारीरिक रोग तर बरा होत नव्हताच; परंतु त्याबरोबर मानसिक यातनाहि तिला खाऊन टाकीत होत्या. आपल्या आयुष्याचा असा अचानक रीतीनें झालेला नाश ती अुघड्या डोळयांनीं दररोज पहात होती. तिच्या निष्क्रिय जीवनाचा तिला कंटाळा आला होता;

पण तें कंटाळवाणें जीवन संपतहि नव्हतें. बरें होण्याची आशाहि तुटत चालली होती. सगळा आधार तुटल्यामुळें गिरक्या घेत घेत खालीं येणाऱ्या सुकलेल्या पानासारखी तिची अवस्था झाली होती.

आत्याबाअींच्या बोलण्यावरून मीं हा अितिहास तयार केला होता; परंतु मीरानें मला तिच्या मागल्या आयुष्यांत कधींच नेलें नाहीं. तिचें सारें बोलणें बहुतेक निरर्थकच असे. वेळ घालविण्याचें अेक अुत्तम साधन म्हणून ती माझ्याकडे पहात होती. आपल्या कल्पना ती वाऱ्यावर सोडून देअी आणि हवेंत अुडणाऱ्या म्हाताऱ्या गोळा करणाऱ्या लहान मुलाप्रमाणें मी त्या पकडत बसें; पण तिच्या मनोवृत्तीचा अंदाज मला कधींच लागत नसे.

मला पाहिल्यावर मात्र तिला फारच आनंद होत असे. अेके दिवशीं मी तिच्याकडे गेलें तेव्हां ती गाढ झोंपली होती. मग तिला न अुठवितां मी देखील खुर्चीतल्या खुर्चीत पेंगूं लागलें. ती थोड्या वेळानें अुठली आणि मला हांका मारूं लागली, " नीरा, अे नीरा, अूठ ना! केव्हां आलीस ग चोरासारखी? मला अुठवायचं कीं नाहीं? मला कां नाहीं हालवून जागं केलंस? मी तुझ्याशीं गप्पा करायला किती अुत्सुक असतें! अन् तूं असा वेळ वांया दवडलास नाहीं का! बघ, चार वाजायला आलेच. आणखी तासाभरानें तूं जाशील. किती द्वाड आहेस ग तूं! "

" अग मीरा, तुला फार चांगली झोंप लागली होती. झोंपेंतून दुसऱ्याला अुठवणं पाप आहे अन् तुला तर झोंपेची किती गरज आहे! " मीं तिच्या खांद्यावर हात टेकीत म्हटलें. ती लटका रुसवा आणीत म्हणाली, " हुं; कांहीं गरज नाहीं झोंपेची. आतां आज मी तुला जाअूं देणार नाहीं आठ वाजेतोंवर! " " मीरा, भलताच काय हट्ट धरतेस? मी मोकळी का आहें वाटेल तितका वेळ बसायला? " " हो! काय काम आहे ग तुला? " ती माझा गाल पिळीत म्हणाली. " तसं नव्हे ग! " मीं अडखळत म्हटलें, " पण माझ्या घरीं माहीत नाहीं मी कुठें जातें तें! " " म्हणजे, तूं फसवून येतेस अिथें? " ती भुवया वर चढवून डोळे मोठे करीत म्हणाली. मी कांहींच अुत्तर न देतां मान खालीं घातली. तिच्या चेहऱ्यावर नेहमींचा तो निर्विकार थंड भाव अुभा राहिला. ती म्हणाली, " समजलं. मी आजारी आहे, तेव्हां माझ्याजवळ आल्यावर तुला घरीं रागें भरतील ना. मग कां आलीस त्यांना फसवून? मला

कुणाचीच सोबत नको, जा अिथून तूं ! अुगाच माझा रोग तुला जडायचा. दुःखाला कोण सोबत देणार? सुख असल्यावर सोबत लागते. आमच्या-सारख्यांनीं असंच पलंगावर रडत पडावं." तिच्या पापण्यांवर पाण्याचे दोन मोठे थेंब अुभे राहिले. तिनें डोळे मिटले आणि ओंठ घट्ट दाबून धरले. अश्रूंचें तें खारट पाणी घरंगळत जाअून तिच्या ओंठांवर पडलें.

"असं कां बरं बोलतेस तूं मीरा? मला यायचं नसतं तर मग मी तुमच्या बंगल्याकडेहि फिरकलें नसतें. घरच्या माणसांची फसवणूक करूनहि रोज मी अिथं येतें. तूंच सांग, कधीं तरी चुकतें का मी यायला? अेकदां तरी मीं जाणीव करून दिली आहे का तुझ्या आजाराची? तुला नको असेल तर मी येणारहि नाहीं. केवळ तुला बरं वाटावं म्हणूनच मी येतें बरं! प्रथम मी पैशाच्या मोहानं आलें होतें. रागावूं नकोस हें सांगितल्याबद्दल; पण आतां मात्र तुझ्या-माझ्यांत अितकी माया निर्माण झाली आहे कीं, तुझ्या प्रेमानें मी रोज अिथें ओढली जातें." मीं तिच्या गालांवरील अश्रुरेषा ओल्या रुमालानें पुसत म्हटलें. मग ती शान्त झाली. अुशीवर डोकें टेकून ती म्हणाली, "नीरा, रागावूं नकोस माझ्यावर. माझ्या आजारामुळें माझा हा स्वभावच झालाय्! सगळ्यांना मी छळतें; पण काय करूं? माझ्या डोळ्यांदेखत काळानें माझं सर्वस्व ओढून नेलं. माझा आनंद, माझा अुत्साह, माझं आरोग्य, माझं हास्य अगदीं सगळं ओरबाडून नेलं आहे. त्याचा सूडच अुगवतं आहे कीं काय माझं मन कुणाला ठाअूक! हल्लीं घरांत मी कुणाला आवडत नाहीं. घरापासून दूर दूर असतें मी. म्हणून असे शब्द जातात तोंडाबाहेर!" मग ती बराच वेळ डोळे मिटून स्वस्थ पडली. असे प्रसंग कधीं कधीं घडत; पण मीराचें बोलणें नेहमीं सूचक असे. त्यांतून प्रत्यक्ष असें कांहींच कळत नसे.

त्या दिवशीं अचानकपणें पावसाळी हवा पडली होती. वाऱ्याला तर वेडच लागलें होतें. धूळ आणि पाचोळा अुधळीत तो धांवत सुटला होता. त्या दिवशीं मीराकडे जावें कीं न जावें ह्या विचारांत मी होतें; पण शेवटीं तिनें रागावूं नये म्हणून मी निघालें. मीराची प्रकृति त्या दिवशीं जास्त बिघडली होती. तिच्या पांढऱ्याफटक चेहऱ्यावर कशाची तरी भीति ठाण देअून बसली होती. मी मीराशीं बोलत होतें तेव्हांच बारीक पाअूस पडूं लागला. त्याचे थंडगार तुषार आंत येअूं लागले म्हणून मी खिडकी लावण्यास अुठलें. मीरा थांबवत

म्हणाली, " नको लावूंस खिडकी. थंडगार वारा येतो तेव्हां बरं वाटतं मला." " पण मीरा, तुला बरं नाहीं आज. वारा घेऊं नकोस अंगावर. परत पाणीहि येतंय् आतां, " मीं खिडकीजवळ जात म्हटलें. " लावूं नकोस म्हणतें ना, परत परत कितीदां सांगायला लावतेस मला ! " ती डोळे वटारून म्हणाली. तिच्या त्या आवेशाची मला थोडी भीतीच वाटली; पण तिचें न अैकतां मी खिडकी लावूं लागलें. त्याबरोबर ती बिछान्यावरून ताडकन् अुठली आणि धांवत माझ्याजवळ आली. माझा हात तिनें झटकून बाजूला केला आणि खिडकींत अुभी राहून ती बाहेरील दृश्य अनिमिष नेत्रांनीं बघूं लागली.

सारीं झाडें अंगांत वारें शिरून गदगदां हालत होतीं. दूरवर नदीवरून पिसाट वाऱ्याचें भयाण गाणें ऐकूं येत होतें. लांबवर दिसणाऱ्या सांवळया डोंगरावर जोराचा पाअूस पडत असावा असें तेथें दाटलेल्या धुक्यावरून वाटत होतें. खिडकींतून जोरानें आलेल्या पाअूसवाऱ्याच्या प्रचंड लाटेनें गुदमरून जाअून मी मागें सरलें; पण ती तशीच निश्चल अुभी होती. कुठला तरी अद्‌भुत देखावा ती भाराबून गेल्याप्रमाणें साऱ्या अवकाशांत पहात होती. अखेर ज्या शक्तीनें तिला खिडकीपर्यंत आणलें होतें ती शक्ति अदृश्य पावली आणि तिचे पाय जागच्या जागीं लटपटूं लागले. तिला दोन्ही हातांनीं धरून मीं बिछान्यावर आणून झोंपविलें. जवळ पडलेल्या टुवालानें मीं तिचें ओलें तोंड स्वच्छ पुसलें आणि गरम मफलर तिच्या गळयाभोंवतीं गुंडाळून पांघरुणानें तिचें अंग लपेटून टाकलें. पलंगावर बसूनच मी निलगिरी तेल हातावर घेअून तिचें कपाळ चोळूं लागलें. माझ्या हातावर आपला हात ठेवीत ती म्हणाली, " नीरा, रागावूं नकोस माझ्यावर. तुझ्याशिवाय कोण मला जवळ करणार आहे आतां? किती चांगली आहेस ग तूं ! " ती हुंदके घशांतच कोंडून स्फुंदूं लागली. मग हलके हलके ती शांत झाली. " नीरा, मला मघां काय वाटलं सांगूं ? " ती म्हणाली, " त्या खिडकींतून अेकदम विजेचा लोळ आंत यावा आणि क्षणांत मीं भस्मसात होअून जावं. तसं मरण किती चांगलं. मला नेहमीं वाटतं कीं, अेका अुत्तुंग शिखरावर आपण अुभं रहावं आणि सारं जग विस्मयानं आपल्याकडे पहात असतांना अेक मोठी वीज अंगावर कडकडून पडावी आणि माझं तें दिव्य मरण साऱ्या जगाला दिसावं ! पण तें शक्य नाहीं. अेखाद्या किड्याप्रमाणें

मी अिथं कोंपऱ्यांत पलंगावरच मरणार ! मी कशी जगलें, कशी मेलें कुणाला समजणार देखील नाहीं ! ”

त्या दिवशींअितकी मीरा मोकळेपणानें पुन्हा कधींच बोलली नाहीं. कदाचित् बोललीहि असती, पण त्यानंतर लगेच दोन - तीन दिवसांनीं तिचा मुक्काम तिथून हालला. त्या दिवशीं तिनें अतिशय मानसिक यातना भोगल्या. कदाचित् सारी रात्रहि तिनें जागचे जागीं दांतओठ खात तळमळत स्फुंदत काढली असावी. ,कारण दुसरे दिवशीं तिची प्रकृति विलक्षण अस्वस्थ झाली. डॉक्टरांच्या सल्ल्याप्रमाणें तिला तिथून दुसऱ्या गांवीं हालणें भाग पडलें. तिला नव्या वातावरणाची आवश्यकता होती असें डॉक्टरांनीं सांगितलें.

आणि मग मीराची नी माझी ताटातूट झाली. तिच्या जाण्याच्या दिवशीं ती कांहींच बोलली नाहीं. फक्त ती माझ्याकडे टक लावून बसली होती. संध्याकाळीं सहा वाजले. दारांत मोटार अुभी राहिली. मीराचे काका आले. त्यांनीं लहान मुलासारखी तिला अुचलून खालीं नेली. मीरा गाडींत बसली. सामान चढवलें गेलें. गाडी निघाली. पार दृष्टीआड गेली. गाडीच्या मागच्या कांचेंतून दिसणारे मीराचे पाण्यानें डबडबलेले डोळेसुद्धां दिसेनासे झाले. पैशांचें पुडकें हातांत घट्ट दाबून आणि दांतांत रुमाल धरून मी दारांत अुभी होतें. शेवटीं मला नकळत माझीं जड पावलें घराची वाट चालूं लागलीं.

आज ह्या क्षणीं मीरा कुठें आहे, तिचें काय झालें ह्याची मला कांहींच दाद नाहीं. मीरानें मला पत्र पाठविलें नाहीं. मीहि तिला धाडलें नाहीं. आमचा संबंध तेवढ्यापुरताच होता; पण तेवढ्या थोड्या वेळांत मात्र आम्हीं अेकमेकींचे जीव कीं प्राण होअून बसलों होतों. आतां जसा जसा अेक अेक दिवस जातो आहे तशी मी मीराला विसरत चाललें आहें, आणि कांहीं दिवसांनीं मला कदाचित् तिची आठवणहि होणार नाहीं; पण जेव्हां जेव्हां मला तिचें स्मरण होतें तेव्हां तेव्हां माझा जीव क्षणभर अुदास होतो आणि मी निःश्वास टाकतें. कसल्या तरी अेका सूक्ष्म तंतूनें मला तिच्याशीं जखडलेलें आहे यांत शंका नाहीं !

‘ नवयुग ’
१८ सप्टेंबर १९४९

★ ★ ★

## कष्टाचें फळ मिळतें ? : : २

" या बाओीसाहेब ! मीं म्हटलं, आठवण आहे कीं नाहीं कुणास ठाअूक आमच्या बोलावण्याची ! " आरशासमोर केस विंचरीत अुभ्या असलेल्या सुमननें झर्‌कन् वळून सास्मित वदनानें माझें स्वागत केलें. आज किती तरी दिवस तिच्याकडे जायचें राहून गेलें होतें माझें. आपल्या लांबसडक केसांच्या रेशमी लडी डाव्या हातानें अुजव्या खांद्यावरून पुढें धरून त्यांवरून हलके हलके फणी फिरवीत सुमन माझ्याशीं बोलूं लागली. बाजूच्या खिडकींतून मावळत्या सूर्याचा अेक तिरपा किरण आंत घुसला होता आणि तिच्या केसांच्या खालच्या टोंकांमधून गुंतून राहिला होता. त्यामुळें तिच्या केसांमधून आधिकच खुलून दिसणारी सोनेरी छटा कौतुकानें न्याहाळीत मीहि तिच्या प्रश्नांचीं अुत्तरें देत बोलत होतें. मग सुमनला चहाची आठवण झाली अन् तिनें चहा ठेवण्यासाठीं स्वयंपाकिणीला मोठ्यानें हांक मारली, " जानकीबाओी ऽऽ ! अहो जानकीबाओी ! "

तें नांव अैकतांच मी अेकदम दचकलें आणि माझ्या हातांतलें पैशांचें पाकीट निसटून माझ्याच पायांवर पडलें. सुमननें जो विशिष्ट हेल काढून ती हांक मारली होती, तो हेल माझ्या परिचयाचा होता, म्हणून मी अधिकच बावरलें. माझी अस्वस्थता तिच्या लक्षांत आली. ती मला म्हणाली, " कां ग ? अेकदम काय झालं तुला ? " ती असं विचारतेय् तोंच अेक गोरटेली, बुटकी, मध्यम वयाची स्त्री हातांतल्या फडक्याला हात पुशीत दाराच्या चौकटींत अुभी राहिली अन् काय हवें म्हणून विचारूं लागली. तिला पहातांच माझ्या मनावरचें दडपण अेकदम दूर झालें आणि मग माझ्या बावळटपणाचें

मलाच हंसू आलें. मीं अेकदम केवढा अशक्य तर्क बांधला होता. सुमनचें कुतूहल अजून दबलें नव्हतें. तिनें परत मघांचा प्रश्न केला. मी हंसतच अुत्तरलें, “ अग, मला वाटलं कीं, आमच्याकडं मागं स्वयंपाकाला जानकीबाअी म्हणून अेक बाअी होत्या त्याच आहेत कीं काय? पण त्या कुठल्या अिथं यायला? त्या वारल्याला दोनतीन वर्षं झालीं असतील ! ”

आणि मग झालें गेलें विसरून आम्ही आमच्या नेहमींच्या गप्पांत रंगून गेलों. सुमनचा निरोप घेअून मी घरीं निघालें अन् मग मघां दाबून टाकलेली आठवण अुसळी मारून वर आली.

जानकीबाअींची ती धिप्पाड काळीसांवळी, सदैव कामांत गुंतलेली मूर्ति अेकदम अुजळून माझ्या डोळ्यांसमोर अुभी राहिली. जेव्हां पहावें तेव्हां त्या कुठल्या तरी अुद्योगांत गढलेल्या असावयाच्या. मी त्यांना माझ्या शैशव-कालापासून पहात आलें होतें. मला कधींहि त्या स्वस्थ बसलेल्या म्हणून आढळल्या नव्हत्या. आतां काय मसाला कुटताहेत, आतां काय सुपारी कुटताहेत, आतां काय पापड वाळत घालताहेत, आतां काय लोणच्यासाठीं कैऱ्या चिरताहेत, आतां काय दुपारच्या करंज्यांसाठीं पुरण करताहेत ! अेक ना दोन ! आमच्यासारख्या सातआठ मंडळींच्या घरांत कामें थोडीं का होतीं? मी, अण्णा, वहिनी ( आअीला मी वहिनी म्हणत असें. ) बजाकाका, मनु-मावशी, माझे थोरले तीन भाअू अन् पाहुणेरावळे ! घरांतलें सारें काम जानकीबाअींवरच पडत असे. कारण आमची आअी थोडी आळशी होती. जानकीबाअीच आमच्या घरांतल्या खऱ्याखुऱ्या गृहिणी होत्या.

जानकीबाअी आमच्या घरांत आल्या तेव्हां मी जन्माला आलें नव्हतें; परंतु त्यांचा अितिहास हजार वेळां मीं मनुमावशीच्या नि वहिनीच्या तोंडून अैकला आहे. आमच्या घरीं कुणीहि आलें कीं त्याला तो अितिहास अेकदां तरी सांगितल्यावांचून वहिनीला राहवत नसे.

“ ही जानकीबाअी, ” वहिनी म्हणे, “ आली आमच्याकडे, तेव्हां फुटका मणीसुद्धां नव्हता अंगावर. तिकडे अिन्दापूरच्या रस्त्याला तें मानवली गांव आहे ना ! गांव कसचं म्हणा ! चार पडकीं घरं अन् ओसाड माळराना-शिवाय आहे काय तिथं ? तिथली ही जानकीबाअी ! लग्न झालं नि मंडपांतच नवरामुलगा मेला; असलं तर बिचारीचं दैव ! मग ज्यानं त्यानं तोंडून

खावी, कोणींहि यावं अन् तोंडाला येअील तें बोलावं. सगळं सोसलंन् बिचारीनं ! मग अेकदां शेजारची सखुताअी आहे नं ! तिची जाअू तिकडे गेली होती माहेरपणाला ; तेव्हां तिला विचारलंन् तिनं, राहतेस का माझ्याकडे म्हणून ! तीहि कंटाळली होती तिथं. आली बापडी सखुताअीच्या जावे-बरोबर अिकडे ! पुढें त्यांची बदली झाली तिकडे गुजराथमध्यें. जानकीबाअी कांहीं कबूल होअीना तिथं जायला. मग त्यांनीं दिली धाडून आमच्याकडे. आम्हांलाहि हवंच होतं कुणी तरी. अेवढे श्रीमंत लोक ते, पण हिला धड नेसायला पण दिलं नाहीं हो त्यांनीं. आतां आमच्याकडे छान रुळली आहे. बरी आपली रात्रंदिवस घरांतच असते. कसलं बंधन नाहीं, कुणाकडे येणंजाणं नाहीं. आमच्या घरांतलीच अेक झाली आहे. ”

पलीकडे स्वयंपाकघरांत पीठ मळीत बसलेल्या, नाहीं तर घसांघसा वाटण वाटीत असलेल्या जानकीबाअींच्या कानीं ही सारी कहाणी जाअून आदळे ; पण तिच्या चेहऱ्यावर कसलाहि बदल होत नसे, कीं कसलेहि भाव खळबळून येत नसत. आपल्या जीवनाची ती शोककथा अैकतांना तिनें कधींहि डोळ्यांना पदर लावला नाहीं, कीं तोंडावाटें हुंदका बाहेर येअू दिला नाहीं. जणुं तिला कानच नव्हते, तिला कांहीं अैकूं येत नव्हतें नि समजतहि नव्हतें. ती आपली हातांतलें काम निमूटपणें करीत राही. ती जणुं काम करण्या-साठींच जन्माला आली होती. जानकीबाअी आणि काम ! बस्स. ह्यापलीकडे दुसरें कांहींच जग नव्हतें तिला !

जानकीबाअीच्या शरीराची अेकंदर ठेवण मोठाड आणि पुरुषी थाटाची होती. तिच्या आवाजांतहि स्त्रीचें मार्दव नव्हतें. कपाळाच्या मानानें तिचें दाभाड आणि हनुवटी अधिक रुंद होतीं. तिच्याकडे अेकदम पहातांच ती कठोर वृत्तीची, थोडीशी अुर्मटच असावी असें पहाणाऱ्याला वाटे. कारण तिचा रंग काळासांवळाच असला तरी डोळ्यांचा रंग विचित्र घारटेला होता. काम करून करून तिचे तळहात राकटले होते. तिच्या हातांवर मोठमोठ्या शिरा टरारून वर आल्या होत्या. अेक पांढरें भोंगळ पोलकें आणि मळकटलेलें धुरकट वास येणारें काळें नाहीं तर जांभळें विटकें लुगडें हा तिचा नेहमींचा वेष असावयाचा. जानकीबाअी प्रथमदर्शनीं कुणालाच आवडत नसे ; पण तिचें काम पाहिल्यावर मात्र जो तो तिची स्तुतीच करी ; पण ती स्तुति

अैकूनहि तिच्या ओठांवर कधीं हसूं अुमटत नसे. तिला पाहिल्यावर कोणी कोणी वहिनीला हलक्या स्वरांत म्हणत, "जरा तुसडी वाटते ही बाअी, नाहीं का हो?"

वास्तविक पहातां जानकीबाअी तुसडी मुळींच नव्हती. ती प्रेमळ तर नव्हतीच नव्हती. खरें म्हणजे तिला कोणत्याहि भावनाच नव्हत्या. वहिनीनें तिला हजार वेळां खेंकसून खेंकसून रागवावें, "जानकीबाअी, सत्रादां सांगितलं असेल कीं, भाताला पाणी ठेवूं नका जास्ती. किती असट केलात हा भात!" पण ती मुकाट्यानें कुठें तरी नजर लावून घुम्यासारखी अुभी राही. ती तोंडांतून ब्र काढीत नसे. तिच्या कपाळाला जरासुद्धां आठी चढत नसे. कोणाला वाटावें ती बहिरी आहे कीं काय? तिला अैकूं जात नाहीं कीं काय?

आमची वहिनी तशी लाघवीपण आहे. जानकीबाअीशीं गोड गोड बोलून तिला खुष करण्याचाहि ती कांहीं कमी प्रयत्न करीत नसे. "आज तुमचीं थालपिटं छान झालीं होतीं हो! ज्यानं त्यानं म्हटलंन् काय खमंग केलीं आहेत म्हणून!" पण अितकें गोड बोलणें अैकूनहि जानकीबाअी कधीं आनंदून जात नसे. ती आपली घुमीच्या घुमीच! अेखादें निर्विकार कधींहि न पालटणारें चित्र कायमचें काढून ठेवावें असा तिचा चेहरा होता.

दुपारची लोळतां लोळतां वहिनी जानकीबाअीला हांक मारून सांगे, "जानकीबाअी, जरा अंग रगडून देतां का?" जानकीबाअी पटकन् कुठें असेल तिथून येअी. आपल्या खरखरीत हातांवर खोबरेल तेल घेअून वहिनीची गोरीगोरी पाठ लालबुन्द होअीपर्यन्त मर्दून देअी. तिच्या खडबडीत हातांवर रुअीचा कापूस फुलून येअी जणुं अशा वेळीं. मग वहिनी म्हणायची, "जानकीबाअी, तुमच्या हातांत कांहीं तरी जादू आहे हो. अंग कसं अगदीं मोकळं होअून गेल्यासारखं वाटतं!" पण जानकीबाअी आपली दुसराच प्रश्न विचारी, "संध्याकाळला वालाची खिचडी करूं कीं बिरडें करूं?"

अुन्हाळयांत वहिनीच्या तळपायांची भारी आग होअी. मग जानकीबाअी काशाची वाटी अन् तूप घेअून वहिनीचे पाय घसाघसा घासून द्यायची. जानकीबाअी काय करीत नव्हती हेंच खरें विचारायला हवें! परंतु ती जें करी तें जीव लावून कोणा तरी आपल्या जिव्हाळयाच्या माणसासाठीं करीत असे, असें मात्र नव्हे. आपण कुणासाठीं तरी खूप कष्ट काढावेत आणि

मग त्याला झालेलें समाधान पाहून आनंदून• जावें ह्या भावनेनें ती कामाचा रगाडा अुपशीत नसे. जानकीबाअीकडे पाहिलें कीं मला घणाघणा फिरणाऱ्या निर्जीव यंत्राची आठवण येअी. कष्ट हेंच तिच्या आयुष्याचें कर्तव्य होतें. दिलेलें काम संपेपर्यंत चोखपणें करीत रहायचें हेंच तिच्या जीवनाचें व्रत होतें. तें काम कां दिलें हें तिनें कधीं विचारलें नाहीं. काम जादा पडलें तरी कुरकूर केली नाहीं. मला आठवतें, अेकदां दिवाळीला आमच्याकडे बरीच पाहुणेमंडळींची गर्दी जमली होती. माझे मामा, त्यांचीं बायको-मुलें, अण्णांचे अेक जिव्हाळयाचे मित्र आणि त्यांचा पोरवडा, म्हणतां म्हणतां घरांत वीसअेक मंडळी जमली. जानकीबाअी त्या वेळीं गुरासारखी राबली.

पहांटे अुठून तिला सकाळच्या फराळाची तयारी करावी लागे. वहिनीचा कटाक्ष होता कीं, फराळाचे कांहीं जिन्नस रोज ताजे झाले पाहिजेत. चहा-कॉफी, खाणें-पिणें झालें, कीं बंब पेटवून आंघोळीचें सत्र संभाळावें लागे. त्याबरोबरच स्वयंपाकघराकडे नजर द्यावी लागे. ती बिचारी पहांटेची अुठून भाजी नी कांदा चिरून ठेवी. जेवणें तरी अेका पंक्तीला थोडींच होत असत ! मुलांचीं आधीं, पुरुषांचीं मागून, बायकांची शेवटीं; शिवाय अुरलेंसुरलें कुणी तरी येअीच. हें सगळें होतें तों दुपारचे तीन वाजत. तोंपर्यन्त ती धगधगत्या चुल्हाण्याशीं घाम गाळीत बसून राही. मग दुपारच्या चहाचा नी खाण्याचा कार्यक्रम सुरू होअी. रोज मंडळी फराळाला येत. हें सगळें करतां करतां जोडीला निवडणें, टिपणें, कोणा बायकांचें अंग रगडून देणें, कुणाच्या मुलाला आंघोळ घालणें अशीं नाना कामें जानकीबाअीच्या अंगावर पडत, कीं परत आपला संध्याकाळच्या जेवणाचा रगाडा सुरू होअी. रात्रीं झोंपायला बारा वाजत तिला. मध्यें पळभर देखील ती अंग टेकत नसे. मला आश्चर्य वाटतें, तिला अेवढें कसें अुरकत असे ! त्याचबरोबर शरमहि वाटते कीं, आम्ही तिला अेवढीसुद्धां मदत करायला गेलों नाहीं कधीं. वहिनीची मदत चिचुंद्रीअेवढीच असायची. आम्ही पोरेंसोरें जानकीबाअीची टिंगलच करीत असूं. जानकीबाअी ताट भरून भाताचा ढीग जेवते ; जानकीबाअी ढक्कन ढेंकर देते. जानकीबाअीला पाहिलें कीं दगडी मारुतीची आठवण येते. अशा नाना तऱ्हांनीं आम्ही तिच्या खोड्या काढीत असूं. ती जेवायला बसली कीं आम्हीं, मुद्दाम

पाणी प्यायच्या मिषानें स्वयंपाकघरांत जावें आणि खुदुखुदु हंसत तिच्या ताटांतला भाताचा ढीग पाहून यावें. त्या साऱ्या गोष्टींची तिला चीड कशी येत नसे कुणास कळे! बरें राग राहूं दे! पण आमच्याबरोबर ती कधीं हंसतही नसे!

मी जसजशी मोठी होअूं लागलें तसतशी मात्र मी तिची थट्टामस्करी करण्याचें हळूहळू सोडून देअूं लागलें. माझ्या मनांत तिच्याविषयीं अेक प्रकारची जिज्ञासा वावरूं लागली. मनुमावशीच्या खांद्यावर हनुवटी टेकून मी तिला हळूच विचारीं, " मावशी, जानकीबाअी कधीं हंसत नाहीं, फारशी बोलत नाहीं, ती कां ग?" "ती कशाला हंसेल? कांहीं तरीच तुझं विचारणं!" मावशी खांद्यानेंच मला ढकलून देअी अन् हातांतलें विणकाम पुढें चालू करी. वहिनीच्यापुढें लोळतां लोळतां मी तिला विचारीं, "वहिनी, जानकीबाअी पहिल्यापासून अशीच आहे का ग?" वहिनी म्हणे, "अशी म्हणजे कशी?" मी आपली गप्पच बसें. घरांतल्या कुणालाच जानकीबाअीची वृत्ति अशी कां ह्याबद्दल चौकशी करावीशी वाटत नसे. ती काम चांगलें करते ना, बस झालं. करायचंय् काय अितर गोष्टींशीं आपल्याला? अशीच सगळयांची वृत्ति होती. जानकीबाअी पोळी वाढा, जानकीबाअी भात आणा ह्यापलीकडे पुरुषमंडळींना तिच्याशीं बोलण्याचें कारणच नव्हतें.

मला ह्याबद्दल थोडें वाअीट वाटे; परंतु मी तरी काय करणार? मी जानकीबाअीशीं बोलण्याचा प्रयत्न करीं. आजुबाजूच्या लोकांच्या गंमती सांगून तिला हंसवण्याची खटपट करून पाहीं. पण छेः! तिच्या चेहऱ्यावर जरा सुद्धां हास्य अुमटेल तर शपथ! फक्त अैकतांना मधून मधून ती माझ्याकडे ओझरती नजर टाकीत असे. 'मी अैकतें आहें हं!' अेवढाच त्या नजरेचा अर्थ होता.

अेकदां बजाकाकाचा मित्र माधव आमच्याकडे कांहीं कामासाठीं येअून राहिला होता. माधव म्हणजे मोठा गुलहौशी गडी होता. माझ्यासारखी सतरा-अठरा वर्षांची तरुण मुलगी पाहून त्याला आपल्या हौशी वृत्तीची चुणूक दाखवायची लहर आली. माझ्याकडे पाहून तो अुगीचच हंसे. माझ्याशीं तासन्‌तास गप्पा करी. हातांतून कप किंवा वर्तमानपत्र घेतांना चुकून स्पर्श झाल्यासारखा अभिनय करी. अेके दिवशीं दुपारीं मी स्वयंपाक-

घरांत कांहीं तरी खाण्याचें शोधीत होतें. जानकीबाओी हरभऱ्याची ओली डाळ वाटीत होती. ती संधि साधून माधव तिथें आला. माझ्या हातांतलें खोबरें त्यानें धसमुसळेपणानें ओढून घेतलें आणि त्याचा अेक तुकडा तोडून माझ्या तोंडांत घातला. माझ्या मनांत अेकदम चलाचिचल झाली. मला धड नाहींहि म्हणतां येअीना; धड होयहि म्हणतां येअीना. परंतु जानकीबाअीच्या देखत हें घडलें. माधव हंसतच तिथून निघून गेला. मी जानकीबाअीकडे रोखरोखून पहात होतें; परंतु तिच्या चेहऱ्यावर जरा सुद्धां कुठल्याहि भावनेची हालचाल झाली नाहीं. अेखादें मांजर समोरून जावें आणि त्याकडे निर्विकार मुद्रेनें बघावें तशी ती ह्या साऱ्या खेळाकडे बघत होती. मला वाटलें ती आतां वहिनीला हें सांगणार; परंतु जानकीबाअी कांहीं बोलली नाहीं. ती माझ्यावर ह्या प्रकाराबद्दल रागावलीहि नाहीं, कीं तिनें माझी प्रेमळ थट्टाहि केली नाहीं.

त्या दिवसापासून जानकीबाअीकडे मी आणखी अेका निराळ्या दृष्टि-कोणांतून पाहूं लागलें. तिच्या मनांत वासनाविकार ह्यांना स्थानच नव्हतें कीं काय? ती कोणा पुरुषमाणसाशीं हंसून-खेळून बोलली असेल हें संभाव्यच नव्हतें. कारण आमच्या घरांत तिनें पुरुषांच्या येण्याजाण्याबद्दल कधीं अुत्सुकता दाखविलीच नाहीं. तिचा नवरा तर मंडपांतच गेला होता. तेव्हां संसार करण्याचें भाग्यहि तिच्या नशिबाला आलें नव्हतें. संसार केल्यावर तिच्या हृदयांत स्त्रीसुलभ वात्सल्य आणि कोमलता जागी झाली असती का? मी माझ्या मनाला वारंवार प्रश्न करीं; पण कदाचित् तिच्या थंड हृदयाला कुठलीच भावना हालवूं शकली नसती तर आपल्या संसारांतहि ती अशीच स्थितप्रज्ञ राहिली असती. मग तिला संसार करावा लागला नाहीं हें अेका परीनें ठीकच झालें. नाहीं तर कदाचित् तिचा पति, तिचीं मुलेंबाळें दुःखी झालीं असतीं. खरोखर जानकीबाअीचा जन्म केवळ कष्ट काढण्या-साठींच होता काय? मग तिच्यांत आणि घाणा ओढणाऱ्या बैलांत काय फरक होता? माझ्या मनांत अशीं अनेक प्रश्नचिन्हें अुभीं रहात; पण त्यांना कोण अुत्तर देअूं शकत होतें?

वर्षांमागून वर्षें जात होतीं. माझ्या तीनहि भावांचीं लग्नें झालीं होतीं. दोघे स्वतंत्र झाले होते. अेक बायको - मुलांसकट घरींच रहात असे. मी कमावती

झालें होतें. अण्णांनीं पेन्शन घेतलें होतें. जानकीबाअी आतां पंचावन्न वर्षांची झाली होती. घरांतल्या अुतारवयाच्या सर्व माणसांना विश्रान्तीची गरज वाटत होती; पण जानकीबाअी अविरतपणें कंबर वांकवून कामें अुरकीत होती; पण कांहीं झालें तरी माणसापेक्षां निसर्गाचें बळ मोठेंच आहे ना! अेके दिवशीं जानकीबाअीच्या वयानें तिला दगा दिलाच. नळावरून घागर भरून आणतांना तिला अेकदम घेरी आली आणि ती धाडकन् पडली. त्या दिवसापासून तिच्या तक्रारी सुरू झाल्या. ती कसेंबसें काम अुरकी अन् अुसंत मिळाली कीं स्वयंपाकघरांत अेका कोपऱ्यांत पोतेरें डोक्याखालीं घेअून लवंडे. शेवटीं शेवटीं ती घरांत सगळयांना अेक लोढणेंच होअून बसली. वहिनी नी मनुमावशी कुजबुजत, 'काय करावं, मेलीला खायला तर पाहिजे. काम मात्र अुरकत नाहीं! वयहि झालंय तिचं म्हणा! आतां नवीन बाअी लावली पाहिजे आपल्याला. मग हिला कुठं धाडायचं? बघूं या काय होतंय्!'

अखेर मिळाली अेकदांची तिला घालवून द्यायची संधि. आमच्या ओळखीचें अेक कुटुंब होतें. त्यांच्याकडे फक्त लहान मुलें संभाळायला अेक म्हातारीशी दाअी पाहिजे होती. वहिनीनें जानकीबाअींना हांक मारली अन् सांगितली सारी परिस्थिति समजावून. त्याच दिवशीं जानकीबाअीला अितकी द्रवलेली मीं प्रथम पाहिली. ती डोळयांतून खळाखळां पाणी गाळीत म्हणाली, "वहिनी, अिथंच राहीन हो मी! कोपऱ्यांत कुठें तरी पडेन. कांहीं त्रास देणार नाहीं. मी का जड झालें तुम्हांला? माझा काय खर्च आहे हो? मला अेक फाटकें लुगडें पुरे. मूठभर भात पुरेल, मी अुपास काढीन. झेपेल तेवढें काम करीन हो वहिनीबाअी! पण मला अिथून घालवूं नका. सारं आयुष्य अिथं काढलं, आतां सरत्या वेळीं नका हो घालवूं मला बाहेर! मला अिथल्यावांचून कुठंहि करमायचं नाहीं!" भडाभडा बोलत होती म्हातारी जानकीबाअी! पण आमची मनुमावशी मोठी खाष्ट होती. तिनें वहिनीचे कान चांगले भरून ठेवले होते. मी वहिनीवर् किती रागावलें! जानकीबाअींचा खर्च मी करीन म्हणून म्हटलें. मग तेवढ्यावरच तें प्रकरण थांबलें.

जानकीबाअीनें सारें कांहीं जाणलें. आपली अिथें कांहीं गरज नाहीं हें तिला कळलें अन् तें तिला फार खुपलें, बोंचलें. दुसऱ्या दिवशीं सकाळीं

जानकीबाअीचा पत्ता नव्हता घरांत ! तिचीं दोन लुगडीं घेअून ती कुठें गेली होती कुणास ठाअूक !

जवळजवळ वर्ष होअून गेलें ह्या गोष्टीला. आम्ही सारे त्या कष्टाळू जीवाला पार विसरून गेलों. घरांत नवी बाअी आली होती. तिची मिजास फार झाली म्हणजे तेवढ्यापुरती जानकीबाअी आठवे वहिनीला ! अेके दिवशीं संध्याकाळीं आम्ही सारीं जणं दिवाणखान्यांत बसून हंसत - खिदळत गप्पा करीत होतों.

अितक्यांत अेक मनुष्य धांपा टाकीत आला अन् त्यानें सांगितलें कीं, अेक म्हातारी भिकारीण रस्ता ओलांडतांना गाडीखालीं चेंगरून जखमी झाली आहे, तिला हॉस्पिटलमध्यें आणलें आहे आणि ती सारखी तुमचेंच नांव काढीत आहे. आमच्या लक्षांत कांहींच प्रकार येअीना. मी, अण्णा नी वहिनी लगबगां त्या माणसामागें गेलों अन् हॉस्पिटलमध्यें पहातों तों जानकीबाअी मरणाशीं झुंज देत पडली होती ! ती कांहींच बोलली नाहीं. फक्त आमच्याकडे किंचित् समाधानानें ती पहात होती अन् तशी नजर लावूनच तिनें अखेरचा श्वास घेतला ! तिच्या आयुष्याचा मधला अितिहास आम्हांला कांहींच कळला नाहीं. फक्त ती रामाच्या देवळांत भीक मागत बसे अेवढीच माहिती समजली !

मीं वहिनीला म्हटलें, " राहिली असती आपल्याकडे तर काय गेलं असतं ग तुमचं ? बिचारी सुखांत तरी मेली असती ! अेखाद्या कुत्र्याप्रमाणें बिचारी चेंगरून - चिरडून मेली ! " वहिनी नुसतीच डोळे पुसत होती.

कुणी कुणी म्हणतात कीं, तुमच्या कष्टांचें फळ आज ना अुद्यां मिळाल्या-शिवाय राहणार नाहीं. तुमच्या श्रमाचें चीज कधीं तरी होअीलच. जानकीबाअी जीव बाहेर निघेपर्यंत कष्टली होती. तिच्या श्रमाला हें असें फळ आलें होतें ! असा शेवट होण्यासाठींच का तिचा जन्म होता ?

'नवयुग'

२० नोव्हेंबर, १९४९

★ ★ ★

# बदला : : ३

चुलीवरच्या भाताला कढ येअून तो चांगला खदखदूं लागला तेव्हां कुठें पाटावर डोकें टेकून पडलेल्या रंगूचें भिरभिरणारें चित्त ठिकाणावर आलें. झटकन् अुठून तिनें पदर खोंवला आणि भाताच्या टोपावरची झांकणी जरा कलती केली. मग फळीवरला डबा काढून तिनें परातींत पीठ घातलें आणि लोट्यांतलें पाणी त्यावर ओतीत ती धबाधबा पीठ मळूं लागली. अितका वेळ दाबून धरलेला सारा अुद्वेग आतां मात्र तिच्या अंतःकरणांत मावेनासा झाला होता. डोळयांवाटें बाहेर पडण्यासाठीं तो आंतल्या आंत तळमळूं लागला होता.

परंतु गेलीं अठ्ठावीस वर्षें आंसवें गाळून गाळून आतां तिचे डोळे अितके कोरडे पडले होते कीं, त्यांना थोडासुद्धां ओलावा येअीनासा झाला होता. आतां डोळयांतलें पाणी आटून गेलें होतें आणि अंतःकरणांतली आग मात्र धगधगूं लागली होती. जेव्हां जेव्हां म्हणून ती अशी अेकटी असे, त्या त्या वेळीं तिच्या मनांतला सारा अुद्वेग असा तडफडून जागा होअी आणि तिच्या विचारांचीं चक्रें घणाघणा फिरूं लागत. ते सारे विचार होते असेंहि म्हणतां आलें नसतें. अुलट्या-सुलट्या कल्पनांची गुंतागुंत होती ती! ती गुंतागुंत तिची तिलाच अुकलत नसे. कां आपलें हृदय असें अकारण विषण्णतेनें भरून जातें अन् कां आपला घसा वारंवार गुदमरून येतो ह्याचा ती सतत शोध लावीत बसे. तो शोध तिला वेणीफणीची पेटी अुघडली म्हणजे पुढ्यांत डौलदारपणें ताठरून अुभ्या रहाणाऱ्या आरशांत पहातांक्षणींच लागत असे. तो आरसा कुत्सितपणें हंसून जणुं तिला म्हणत असे, “ काय बघतेस ? आहे का कांहीं बघण्यासारखं ? चल हो दूर ! माझा जन्म कांहीं तुझ्यासारख्या कुरूप

माणसांसाठीं झालेला नाहीं!" मग रागानें ती पेटीचें झांकण फटकन् बंद करी अन् गुडघ्यांत डोकें खुपसून हुमसाहुमशी रडत बसे.

खरोखरीच निसर्गानें तिला अगदीं अुलट्या काळजानेंच जन्माला घातलें होतें. तिच्या त्या बुटक्या स्थूल शरीरामध्यें स्त्रीदेहाला आवश्यक असणारी मोहक वक्रता मुळींच नव्हती. त्यामुळें चालतांना ती अगदीं बेंगरूळ दिसे. तिच्या घट्ट ओढून बांधलेल्या टीचभर केसांचा सुपारीअेवढा बुचडा तिच्या बावळटपणांत अधिकच भर घाली. त्यांतून चेहरा जरा बरा असता तर तिच्याकडे पाहून थोडी तरी प्रसन्नता वाटली असती; पण त्या बाबतींत निसर्गानें क्रूरपणाची अगदीं कमाल केली होती! तिचा एक डोळा जन्मतःच वाजवीपेक्षां बारीक होता. भुवयांचा चेहऱ्यावर कुठें पत्ताच नव्हता आणि सबंध तोंडावर विस्तवावर भाजून काढल्यासारखे किळसवाणे तांबडे डाग होते. आपला तो विद्रूप अवतार आरशांत पाहिला म्हणजे तिच्या अंतःकरणाला विलक्षण कंप सुटे. 'कां, कां, कां मला जन्माला घातलं माझ्या आअीबापांनीं?' अशी आर्त किंकाळी फोडून ती वेड्यासारखी छाती पिटून घेअी अन् पुढ्यांतल्या पाटावर थडाथडा मस्तक आपटीत राही.

तिच्या जखमी हृदयांत नाना पडसाद अुमटत रहात. 'काय हक्क आहे मला ह्या जगांत सुखानं जगण्याचा? माझ्या जगण्यानं कुणाला आनंद आहे? कुणाच्या समाधानासाठीं मीं हा देह पोसत बसायचं? आज अठ्ठावीस वर्षांच्या आयुष्यांत कुणीं माझ्या पाठीवरून मायेनं हात फिरवला का कधीं? आअी, तूं तरी अितक्या लवकर सोडून जायचं नव्हतंस मला! मी कुरूप म्हणून तूं नसतंस कधीं मला दूर लोटलंस. अुलट सगळ्या जगानं झिडकारलेल्या तुझ्या दुर्दैवी पोरीला तूं अधिक प्रेमानं पोटाजवळ ओढलं असतंस! माझ्या अंगच्या गुणांचं तूं तरी कौतुक केलं असतंस! कशाला ह्या बदनशिबी पोरीला मागं ठेवून मेलीस ग माझे माअुली?' आजपर्यंत हजार वेळां तिनें स्वतःच्या मनाला हाच प्रश्न केला होता.

कधीं कधीं तिला वाटे कीं, अेक सुरा घेअून चेहरा जागोजागीं भोसकून काढावा आणि रक्तबंबाळ चेहऱ्यानें दुष्ट जगापुढें अुभें राहून खदखदां हंसावें, जगाच्या तोंडावर थू थू थुंकावें आणि कानांवर कडाकडा बोटें

मोडीत शिव्यांची लाखोली वहात तिथल्या तिथें प्राण सोडावेत! पण तसें करण्याचा तिला कधींच धीर झाला नव्हता. अेकामागून अेक दिवस अुलटून चालले होते आणि सारें दुःख मुकाट्यानें गिळून ती आयुष्याचें ओझें मानेवर घेअून बसली होती. 'काय अर्थ आहे ह्या जीवनामध्यें?' ती वारंवार स्वतःलाच सवाल करी.

आतां देखील भाकऱ्या बडवून ती तात्यांची, तिच्या वडिलांची, वाट पहात बसली होती, तेव्हां तिनें हाच प्रश्न आपल्या मनाला केला. तोंच बाहेरचें दार कर्र वाजलें, वाऱ्याची अेक झोंबरी लाट आंत घुसली आणि मागून तात्यांची स्वारी घरामध्यें आली. 'रंग्ये, झाला का ग सैपाक? चल आटोप, पान मांड माझं!' खरखरीत आवाजांत त्यांनीं हुकूम सोडला. डोअी-वरचा पांढरा रुमाल काढतां काढतां त्यांना अेकदम जबरदस्त ढांस लागली आणि ते घसा खरडून खरडून खोकूं लागले. मग कोपऱ्यांत ठेवलेल्या पितळी भांड्यांत त्यांनीं खकारा काढला आणि आपल्या लालबुंद नाकाचा लठ्ठ शेंडा खाजवीत ते स्वयंपाकघरांत आले.

तो खोकला अैकला कीं रंगूच्या अंगावर कांटा अुमटत असे. पिवळ्याजर्द कफानें भरलेलें तें पितळेचें भांडें तिच्या डोळ्यांसमोर येअी आणि तें शेवटीं आपल्यालाच साफ करावें लागत आहे ही जाणीव होअून ती किळसून जात असे. तिला वाटे, आपल्या म्हाताऱ्या बापाच्या घरीं जन्मभर कष्टाचा गाडा अुपशीत बसण्यासाठींच का आपला जन्म आहे? आपल्या बापाचा तोच तोच थंड चेहरा गेलीं अठ्ठावीस वर्षें पाहून पाहून तिला अगदीं वीट आला होता. आपल्या कुरूपपणाची सबब पुढें करून आपलें लग्न न जुळविता जन्मभर आपल्याला मोलकरणीसारखी राबविणाऱ्या मतलबी पित्याची तिला मनस्वी चीड आली होती. तात्यांपुढें जेवणाचें ताट आदळतांना ती सारी व्यक्त करण्याचा तिनें प्रयत्न केला होता. तोंच ते खेकसले, "केवढ्यांदां आदळ-तेय्स ग ताट? कसला माज चढलाय् तुला अेवढा? अन् काय ग, सदान् कदा नाकाला पदर लावून बसायला काय झालंय् तुला? काय तुझा बाप मरायला टेकलाय् का काय? चांगली रात्रंदिवस वाडगा भरून अन्न ढोसतेस, गुरा-सारखी अुठल्यासुठल्या लोळत पडतेस अन् सुखासुखी आदळआपट करायला काय झालं तुला? चल, भाकरी आण मला!"

रंगूनें मुकाट्यानें भाकरी वाढली. तिला वाटलें, असेंच्या असें ह्या म्हाताऱ्याला गदागदां हालवून विचारावें, "दोन वेळां पोट भरलं म्हणजे कांहीं अंतःकरणाची भूक शमते होय तात्या? मला अेक वेळ भाकरी कमी पडली तरी चालेल, पण मला मायेची गरज आहे, मला प्रेमाची भूक लागली आहे! मला माझं स्वतःचं घर हवंय हो तात्या!"

कसें तरी जेवण आटोपून तिनें बत्ती मालवली आणि स्वयंपाकघरांत अंथरलेल्या घोंगडीवर अंग आदळलें. "कशाला जगतेंय मी? कुणासाठीं जगतेंय मी? काय अर्थ आहे ह्या आयुष्याचा?" परत तेच दुष्ट प्रश्न तिच्या अंतःकरणाच्या दारावर धक्के मारूं लागले. तिच्या रुक्ष, निष्प्रेम आयुष्याचें भेसूर चित्र हळूहळू तिच्या डोळयांसमोर अुमटूं लागलें.

पांचव्या वर्षींच आअीला पारखया झालेल्या रंगूच्या पाठीवर परत म्हणून कांहीं कुणीं प्रेमानें हात फिरवला नव्हता. तिची अेक दूरची अनाथ विधवा आत्याबाअी स्वयंपाकपाणी पहायला घरांत येअून राहिली होती. तिनें घरांत येण्यापूर्वी रंगूला कधींहि पाहिलेलें नव्हतें. रंगूचें पहिलें दर्शन होतांच आत्याबाअीच्या कपाळावर ज्या आठ्या चढल्या होत्या त्या पुन्हां कांहीं खालीं अुतरल्या नव्हत्या. अूठ कीं सूट त्या आपल्या रंगूला बदड बदड बदडीत. "अवलक्षणी कारटी मेली! तोंड तर पहा माकडाचं!" त्या वारंवार अुद्गार काढीत. तात्यांनीं पण कधीं त्यांना त्याबद्दल फैलावर घेतलें नाहीं. कारण त्यांना आत्याबाअीची गरज होती आणि रंगूबद्दल पहिल्यापासूनच तिटकारा होता. आपली बायको ही अडगळ विनाकारण मागें ठेवून गेली असेंच त्यांना वाटे. शिवाय आत्याबाअीवर त्यांचा भारी जीव! आत्याबाअींची मर्जी सांभाळणें हें तर त्यांचें पहिलें कर्तव्य होतें! आत्याबाअी स्वयंपाकपाणी बघायला म्हणून आल्या होत्या खऱ्या; पण खरी राबत असे बिचारी रंगूच! रंगू सोळा वर्षांची होती तेव्हां तात्यांशीं कशावरून तरी कडाक्याचें भांडण करून आत्याबाअी घरांतून चालत्या झाल्या.

अेकूण घरांत रंगूला माया म्हणजे काय माहीतच नव्हतें. तात्यांनीं आणलेली भाजी मुकाट्यानें शिजवावी, त्यांनीं अंगावर फेकलेलीं दोन पातळें चिंध्या चिंध्या होअीपर्यंत नेसावीत. 'तुला हें लुगडं खुलून दिसतं हं!' असा अुद्गार

अैकण्याचें भाग्य तर तिच्या नशिबींच नव्हतें. ‘तुला आवडणारी कोणती वस्तु घेअून येअूं ?’ म्हणूनहि तिला कधीं कुणीं विचारलें नव्हतें.

घराबाहेर ओळखीचीं माणसें पुष्कळ होतीं; परंतु जिव्हाळयाचीं माणसें मात्र कुणी नव्हतीं. तिचें फारसें कधींहि कौतुक झालेंच नाहीं आणि जरी थोडेंसें झालेंच तरी त्या कौतुकामधून कुणाच्या मनांत जिव्हाळा अुत्पन्न झाला नव्हता. तिच्या अंगांतल्या सर्वच गुणांचें असें झालें होतें. रंगू अगदीं वाखाणण्यासारखा स्वयंपाक करीत असे. साक्षात् अन्नपूर्णाच होती ती ! अेखाद्या भरल्या घरांत ती पडली असती तर सगळयांच्या जिभेचे चोंचले तिनें रात्र-दिवस पुरविले असते. तिच्या ओळखीचीं माणसें घरीं मोठा स्वयंपाक असला कीं तिला नेहमीं मदतीला बोलवीत; पण तीं फक्त गरजेसाठीं धांवत येत. रंगूचें हें कौशल्य पाहून कुणाच्या मनांत चिरंतन जिव्हाळा कधींहि अुत्पन्न झाला नव्हता. तिच्याशीं बोलतांना अेक तर माणसें तिच्या चेहऱ्याकडे पहाण्याचें टाळीत किंवा तिच्या चेहऱ्याकडे टवकारून तरी पहात.

आणि ह्याची जाणीव रंगूला वयांत आल्यापासून भयंकर बोंचूं लागली होती. तिच्या वयाच्या मुली लाडेलाडे माना घुसळून बोलत असत. सणा-सुदीला चांगले-चुंगले कपडे, दागिने घालून नटत-थटत; पण रंगूला तसें करायची लाज वाटे. ‘छे ! मला शोभून नाहीं दिसणार तें ! मला तें सुख ह्या जन्मांत कधींच मिळणार नाहीं !’ असें म्हणून ती अंतःकरणांतल्या साऱ्या स्त्रीसुलभ आवडी-निवडी निराशेनें जागच्या जागींच दाबून टाकी.

अेकदां ती अेका ओळखीच्या बाअीकडे दिवाळींत फराळाचें करून द्यायला गेली होती. तिनें वळलेल्या बेसनाच्या खमंग लाडवाचा तुकडा मोडतां मोडतां ती बाअी म्हणाली, “काय सुग्रण आहांत हो रंगूताअी ! तुमच्या हातांत अगदीं अमृत भरलंय !” आणि मग त्या बाअीनें खुष होअून रंगूला अेक सुंदरसें पिस्तिया रंगाचें लुगडें दिलें होतें. तें लुगडें नेसून रंगू त्याच बाअीकडे अेक दिवस जेवायला गेली होती. माजघरांत बसलेल्या बायका तिला पाहून मिस्किलपणें अेकमेकींकडे बघून हंसूं लागल्या. रंगूच्या तें लक्षांत आल्यावर तिला त्या बायकांचा संताप तर आलाच; पण त्याहूनहि तिला स्वतःची चीड आली. तिला वाटलें झळझळत्या विस्तवावर अेकेकीचें

तोंड धरून भाजून काढावें आणि प्रत्येकीच्या पुढ्यांत आरसा ठेवून विचारावें, " आतां तरी कळतील का माझ्या अंतःकरणाच्या वेदना ? "

त्या दिवशीं घरीं आल्यावर तिनें तें लुगडें रागारागानें टरटरां फाडलें. जीव गुदमरून जाऊन असहाय्यपणानें ती तडफडत होती. तिच्या कुरूप-पणानें तिला केवढ्या भयाण अेकांतवासांत फेंकून दिलें होतें ह्याची कल्पना तिला त्या दिवशीं प्रथम आली होती. अेखादें लूत भरलेलें कुतरडें अुकिरड्या-वर अेकटेंच केंकाटत पडावें तशी तिची अवस्था झाली होती.

ती परत स्वतःच्या मनाला विचारूं लागली, " सारा जन्म असाच अेकटे-पणानं काढायचा ? कुणालासुद्धां मी हवीशी वाटत नाहीं का ? देवा, कशाला ही जाणीव दिली आहेस मला ? कशाला हें संवेदनाक्षम मानवी अंतःकरण दिलं आहेस मला ? जिच्या अस्तित्वानं कुणाच्याहि जीवनांत आनंद नाहीं अशा दुर्दैवी स्त्रीनं जगायचं तरी कां ? कशासाठीं ? कुणासाठीं ? माझं आयुष्य अपेशी ठरलंय् ! म्हणूनच ह्या यातनांचा नरकवास कपाळीं आला आहे माझ्या ! होय ! हेंच खरं आहे ! जो आयुष्यांत यशस्वी ठरतो त्यालाच मान वर करून जगण्यांत आनंद वाटतो ! "

रंगूला सारें घर कसें खायला येअी. त्या चार भिंताडांत रोज अेकेक दिवस मोजतां मोजतां तिचा जीव शिणून गेला होता. तें घर सोडून दूर कुठें तरी जाअून जीव द्यावा असें तिला वाटूं लागे; परंतु तिला तात्यांची भीति वाटे. आपल्या पित्याशीं आपण अितकें कृतघ्न राहून तरी कसें चालेल, असाहि विचार तिच्या मनांत येअी. तिच्या हृदयांतला कुठला तरी नाजुक धागा थरथरूं लागे. कांहीं झालं तरी आपल्या पित्याला म्हातारपणांत तरी आधार आपण द्यायला हवा असं तिला वाटे.

पण तात्यांनीं मात्र तिची कधींहि पर्वा केली नव्हती. अेकदां रंगूचा मामा रंगूला आपल्याबरोबर घेअून जायला तयार झाला होता. त्याचा अेक अनाथाश्रम होता. त्याच्या मनांतून कामसू रंगूला तिकडे देखभाल करावयास घेअून जावयाचें होतें; पण तात्यांनीं स्पष्ट नकार दिला. " ती गेल्यावर मी काय अिथं चूल फुंकत बसूं होय ? " ते म्हणाले होते.

" मग अेखादा गडी ठेवा. अितके कांहीं दारिद्री नाहींत तुम्ही ! " मामा म्हणाले.

" कांहीं नको ! अिथंच बरी आहे ती ! लोकांची सेवा करीत बसायला तिचा जीव कांहीं वर आला नाहीं, कीं तिच्या बापालाहि कांहीं भीक लागली नाहीं. अन् तिलाहि घरांतच बरं वाटतं ! " असं बोलून तात्यांनीं मामांना वाटेला लावलं होतं. रंगूनें हताश होअून स्वतःशींच अुद्गार काढला होता, " छे ! ह्या घरांतून जन्मांत कधीं बाहेर पडण्याची आशाच नको ! अिथंच कुजत पडून मरणार मी ! "

अशीं तिच्या आयुष्यांतलीं अठ्ठावीस वर्षें अुलटून गेलीं होतीं. कांहीं घडलें नव्हतें अखेर ! एका वर्षासारखेंच दुसरें वर्ष अुलटून गेलें होतें.

तिच्या भावना आतां अगदीं बोथटल्या होत्या. तिच्या शब्दाशब्दामध्यें आतां थंड कठोरपणा व्यक्त होअूं लागला होता. जुन्या तापदायक आठवणी काढतां काढतां तिच्या अंतःकरणामध्यें अेक विचित्र पाशवी वृत्ति चळवळ करूं लागली होती. आपल्या आयुष्याची निष्प्रेम कहाणी अंथरुणावर पडल्या पडल्या जेव्हां ती आठवूं लागली तेव्हां तिच्या त्या पाशवी वृत्तीला चोहों-कडून धार चढूं लागली.

अितक्यांत पलीकडच्या खोलींत पडलेल्या तात्यांना ढांस लागली. त्यांनीं खोकतां खोकतांच रंगूला हांक मारली, " रंग्ये, अग पाणी आण ग ! जागी आहेस ना ? "

पण रंगू जागची हाललीच नाहीं. " बोंबलूं दे म्हाताऱ्याला ! " कुठल्या तरी आसुरी आनंदानें हुरळून जाअून ती खदखदां हंसूं लागली. त्या हंसण्यानें तिचें सारें शरीर गदगदून गेलें आणि तिच्या रक्तांतून अेक विकृत वासना अुफाळून आली. मग ती ताडकन् अुठली. कोपऱ्यांत भरून ठेवलेला पाण्याचा हंडा तिनें अुचलला आणि अुन्मत्तपणें धांवत ती शेजारच्या खोलींत आली. बारक्या कंदिलाच्या अंधुक प्रकाशांत अधिकच भेसूर दिसणाऱ्या तात्यांच्या चेहऱ्याकडे तिनें अेकवार निरखून पाहिलें आणि आपला ओठ रक्त येअीपर्यंत चावून तिनें तो हंडा ताडकन् त्या म्हाताऱ्याच्या कपाळावर हाणला. " घे, घे, हवं तितकं पाणी घे ! राक्षस मेला ! तुझ्या पोटीं जन्माला आलें नसतें तर अशी वेडीविद्री कशाला झालें असतें मी ? तरी तुझ्यापाशीं अेवढे हाल सोसतेंय मी ! पण तुला त्याचं आहे का कांहीं ? पाणी मागतंय् म्हातारडं !

घे ! घे ! ! ” ती बेभान होअून किंचाळूं लागली. अेखाद्या गुरासारख्या आरोळ्या मारीत तात्यांनीं जमिनीवर मान टाकली !

तो आक्रोश अैकून वाड्यांतल्या अंगणामध्यें खाटा टाकून झोंपलेली पुरुषमंडळी धांवत आली नि दारावर धक्के मारूं लागली. रंगूनें त्वेशानें दाराची कडी काढली आणि मस्तक फुटेपर्यंत आवाज चढवून ती म्हणाली, “ मारा, मारा, मारा मला अेकदांची आणि मग जन्मभर हंसत बसा ! ” डोळ्यांचें पातें लवतें न लवतें तों ती स्वयंपाकघरांत धांवत गेली आणि तिनें दार लावून टाकलें. ती सारी मंडळी घाबरून स्वंयपाकघराचें दार अुघडण्याचा प्रयत्न करूं लागली. तोंच कसला तरी विचित्र जळका वास त्या खोलींतून पसरूं लागला. दारावर चढून वरच्या कवाडांतून आंत बघतां बघतां अेक जण किंचाळला, “ दार फोडा, दार फोडा ! तिनं लुगडं पेटवलयं् आपलं ! ”

बऱ्याच खटाटोपानंतर दार फोडून लोक आंत घुसले तों दारापुढेंच रंगूचा भाजलेला देह तडफडत पडला होता आणि तिच्या हातालगतच अेक तडा गेलेला आरसा पडला होता !

‘ नवयुग ’
दिवाळी अंक १९५०



# टळलेली वेळ : : ४

कुलूप अुघडून वत्सलाबाअींनीं खोलीचें दार ढकललें आणि आंत पाअूल टाकतांक्षणीं त्यांचा जीव गुदमरून आला. रोज ह्याच वेळीं शाळेंतलें काम आटोपून त्या घरीं परत येत. कुलूप अुघडून अशाच दार ढकलत आणि आंत पाअूल टाकतांक्षणीं असाच त्यांचा जीव गुदमरून येअी. दार अुघडतांच, त्या खोलींत भरून राहिलेली निर्जन भयाणता त्यांना आ वासून गिळायला येअी. खोलींत दरवळत असलेला कसला तरी जुनाट अुग्र वास त्यांच्या नाकाला झोंबूं लागे. खोलीचीं खिडक्या-दारें बंद असल्यानें कानाकोपऱ्यांत रेंगाळत असलेला अंधार त्यांच्या अुद्विग्नतेंत आणखीनच भर घाली. समोरच्या फडताळावर चिकटून बसलेली लोचट पाल नेमकी खोलींत शिरतांच प्रथम दृष्टीस पडे. नाहीं म्हणायला मावळतीवर टेकूं पहाणाऱ्या सूर्याच्या अेक नाजुक किरण खिडकीच्या चिरेंतून घुसून थेट सतरंजीवर येअून पडलेला असे; पण त्याच्या अंतरंगांत देखील धुळीचे कण तरंगत असत. अेक प्रकारचा दुष्ट निर्दय घुमेपणा त्यांच्याकडे प्रत्येक वस्तुवस्तूमधून टवकारून पहात असे जणुं! मुकाट्यानें हातांतलीं पुस्तकें आणि मनिबॅग डावीकडे ठेवलेल्या पलंगावर त्या फेंकून देत आणि कोंपऱ्यांतल्या टेबलावरचा 'स्टोव्ह' पेटविण्यासाठीं स्पिरिटच्या बाटलींत काकडा बुचकळीत.

आजहि त्यांनीं तेंच केलें. स्पिरिट फसफसून काकड्याच्या गिरदींत शिरलें तरी शून्य मनानें आणि शून्य नजरेनें त्या स्तब्ध अुभ्या होत्या. बाटलींत बुडविलेला काकडा तसाच टाकून त्या अुलट फिरल्या आणि आपलें गळलेलें-थकलेलें शरीर त्यांनीं पलंगावर झोकून दिलें. त्यासरशीं गादींत ठसठसून

भरलेली धूळ अेकदम अुसळून वर अुडाली आणि तिचे कण नाकातोंडांत गेल्यानें त्यांना ठसका लागला. आज किती तरी दिवस ही गादी झटकावी, अुन्हांत टाकावी असा विचार त्या करीत होत्या; पण मनांत आलेला विचार कृतींत अुतरविण्याला त्यांच्याजवळ अुत्साहच कुठें अुरला होता! त्यांच्या शरीरावर अेक प्रकारचें शैथिल्य दाटून आलें होतें. त्यांच्या मनाला ग्लानि चढली होती. जीवनाचें रिकामें पात्र घेअून त्या आज चाळिशीच्या अुंबरठ्यावर अुभ्या होत्या. रेताड माळरानामध्यें गवताची काडी हुंगीत हुंगीत अेखाद्या मरतुकड्या जनावरानें खुरडत खुरडत हिंडावें तशी त्यांची अवस्था झाली होती. अुल्हासाचा अेखादा क्षण धुंडाळीत त्या असहाय्यपणें पायाखालची वाट तुडवीत चालल्या होत्या. कांटे बोंचत होते, खडे टोंचत होते, डोळ्यांतून पाणी गळत होतें. तरीही त्या चालल्या होत्या. नाअिलाजानें चालल्या होत्या. गत्यन्तर नव्हतें म्हणून चालल्या होत्या. ही रुक्ष, वैराण वाट संपतहि नव्हती. वाटचालीचे श्रम हलके व्हावेत म्हणून प्रेमानें कुणाशीं सुखदुःखाच्या गोष्टी करींत जावें तर तेंहि शक्य नव्हतें.

तशी माणसांची कमतरता नव्हती त्यांना कधीं! पण तासन्तास गप्पा करूनहि त्यांच्या मनावरचें दडपण दूरच होत नव्हतें. हृदयांतल्या गोष्टी ओंठावरच रेंगाळून परत मागें फिरत होत्या. जें सांगावयाचें होतें तें सांगतां येत नव्हतें. जें अैकावयाची अिच्छा होती तें कानावर पडत नव्हतें. नात्यागोत्याच्या सगळया माणसांचे कष्ट काढून त्या अखेर अेकट्याच अुरल्या होत्या. आपापला स्वार्थ साधून, आपापली तुंबडी भरून प्रत्येक जण त्यांना पाठीं टाकून निघून गेला होता. त्यांचीं भावंडें तरी आज त्यांच्याजवळ कुठें होतीं? अनाथ विधवा आअीचे डोळे पदरानें टिपत टिपत त्यांनीं धाकट्या भावांना पोटाशीं धरून मार्ग काढला होता. नोकरीचे कष्ट स्वतः काढून त्यांनीं पाठच्या तीन भावांचें शिक्षण करून त्यांना नोकऱ्या लावून दिल्या होत्या. आतां स्वतःच्या संसार थाटून प्रत्येक जण आपापल्या नोकरीच्या गांवीं होता. गांवांतच रहाणारा अेक भाअू तर स्वतंत्र बिऱ्हाड करून होता. आअीनें अखेर डोळे मिटले होते आणि शेवटीं वत्सलाबाअी अेकट्या अुरल्या होत्या. त्या कोंदट खोलीच्या कैदखान्यात स्वतःला कोंडून घेअून अुघड्या डोळ्यांनीं जीवनाची कणाकणानें होणारी झीज निरखीत त्या बसल्या होत्या.

ह्याच खोलींत त्यांचा जन्म झाला होता. ह्याच खोलींत त्या लहानाच्या मोठ्या झाल्या होत्या. ह्याच खोलीच्या कोनाकोपऱ्यांत त्यांच्या तारुण्यांतले निःश्वास अजून दरवळत होते आणि ह्याच खोलींत अेकल्या जीवनाची कडवट चव घेत त्या आतां जीवनाच्या अुताराकडे जाण्याची तयारी करीत होत्या.

कधींमधीं आवतींभोंवतींचीं माणसें प्रेमानें येअून चौकशी करीत. घरांत केलेले चांगलेचुंगले जिन्नस बशींत घालून पाठवीत. 'असूं दे, अेकटी बाअी आहे बिचारी, तिला कोण देणार? तिची ती काय करून खाणार?' असे आपआपसांत अुद्गार काढून हीं माणसें त्यांच्यावर दया करूं पहात; पण वत्सलाबाअींना असली कींव नको होती. दुसऱ्यांवर अुपकार करण्याचें समाधान मिळावें म्हणूनच हीं माणसें आपल्याभोंवतीं घोंघावत येतात हें त्या पुरतें जाणून होत्या. त्यांनीं पाठविलेले जिन्नस तसेच्या तसे मातींत फेकून द्यावेत आणि धाडकन् दार लोटून घेअून त्यांचा झणझणीत अपमान करावा, असा तीव्र विचार कधीं कधीं त्यांना चाटून जाअी; पण तशा त्या समंजस होत्या. "ह्या लोकांचा तरी काय दोष? त्यांनीं माझं काय वांकडं केलंय्? त्यांना बिचाऱ्यांना कां दुखवायचं?" असा अुद्गार काढून त्या आपलें भणभणणारें मस्तक दाबून धरून शान्तपणें डोळे मिटून घेत.

पण हा समंजसपणा म्हणजे देखील त्यांना अेक ढोंग वाटे कधीं कधीं. समाजांत वावरतांना त्यांना विनाकारणच ओठांवर स्मितरेषा ओढावी लागत असे; पण आपलें सारें हंसणें त्यांना रिकाम्या भांड्यांच्या खडखडाटाप्रमाणें अर्थशून्य वाटूं लागलें होतें. जग त्यांना अेक त्यागी स्त्री म्हणून ओळखत होतें; पण आतां त्यांना जगाला ओरडून सांगावेंसें वाटत होतें कीं, नाहीं, नाहीं! मी त्यागी नाहीं! हें सारें अेक ढोंग आहे. हा त्याग माझ्यावर लादला गेला आहे. हें वैराग्य म्हणजे अेक पांघरलेलें कातडें आहे. मला अितर चार माणसांसारखीच सुखाची लालसा आहे. सगळ्या सामान्य जनांच्या अंतःकरणांत धुमसणारी भोगेच्छा माझ्याहि अंतःकरणांत तितक्याच तीव्रतेनें धुमसत आहे. तुम्हां सर्व लोकांना चैन करतांना पाहून मलाहि वाटतं कीं, आपण पण हें अंगावरलें पांढरें वस्त्र फेंकून द्यावें आणि मनाची जरा हौस पुरवावी.

वत्सलाबाओींना असें वाटत असे खरें; तरी पण घाण्याला जुंपलेल्या बैला-प्रमाणें डोळे मिटून घेअून आंखलेल्या चाकोरींतूनच त्या फिरत राहिल्या होत्या. कारण वयोमानाप्रमाणें जनाची लाजहि वाढत गेली होती. लोक काय म्हणतील हा अेकच प्रश्न तर त्यांना अितका भेडसावीत होता कीं, आहे त्या जागेवरून तसूंभरसुद्धां हालण्यास त्या तयार होत नव्हत्या. आजपर्यंत आपण अेवढी मर्यादा ठेवून वागत आलों आणि आपल्या ह्या चांगुलपणाबद्दल जगाकडून शाबासकी मिळविली. अितरांना सावलींत वाढवतांना स्वतःच्या माथ्याला चटके लागले तेहि निमूटपणें सहन केले आणि आतां वय वाढल्या-वर आपण स्वतःला न शोभणारें वर्तन केलें तर जग हंसणार नाहीं का, असा विचार करून त्या परत आपल्या खोड्यांतच जखडून रहात.

पण आंखडून गेलेले अवयव कधीं ना कधीं तरी चळवळ केल्याखेरीज थोडेच रहातात! मग त्यांचें त्यांनाच वाटूं लागे, मी तरी जगाची बांधील काय म्हणून राहूं? जग माझ्या त्यागाचें कौतुक करतें खरें; अेक अत्यन्त सालस स्त्री म्हणून मला गौरवितें खरें! हो, गौरवील तर काय झालें! आपापली तुंबडी भरल्यावर दुसऱ्याच्या अुपासाचें कौतुक करायला लोकांचें काय जातें? देवघरांतल्या सोन्याचांदीच्या मूर्तींप्रमाणें तत्त्वांची पूजा हे लोक फक्त दुरून करीत असतात. मी अेवढे कष्ट काढतें; पण आतां अखेर मला विश्रांति मिळावी, मला क्षणभर अंग टेकायला मिळावें, म्हणून कुणी माझ्या-साठीं अंथरूण-पांघरुणाची तरतूद करतें आहे का? मग कशाला ह्यांची तरी पर्वा करायची? वागलें मी माझ्या मनाप्रमाणें चार दिवस तर काय जातें ह्यांचें? हंसले तर हंसूं देत! आजवर कौतुकानें हंसले ते उद्यां उपहासानें हंसतील अेवढेंच ना?

विचारांच्या त्या चक्रव्यूहांतून त्यांचें मन आडवें-तिडवें धांवत जाओ अन् अखेर परत आपलें मूळ पदावरच येओ. आपल्या ह्या शेळपटपणाची त्यांना चीड येओ; पण तो त्यांच्या आतां रक्तांतच मुरला होता. रोज अुठून तेंच तेंच जीवन जगायची त्यांना आतां शिसारी आली होती; पण भोंवतालीं पडलेली कृत्रिम तटबंदी फोडण्याची धमकच त्यांच्यांत कुठें अुरली होती? त्यांच्या तारुण्याबरोबरच ती त्यांचा निरोप घेअून गेली होती. आतां ढोंगानें भरलेला रुक्ष प्रौढपणा त्यांच्यावर हुकमत गाजवीत होता.

रोज अुठून अेकटें खायचें-प्यायचें, अेकटें भुतासारखें वावरायचें हें त्यांना आतां नको झालें होतें. अेकटीसाठीं कांहीं करून खायचें त्यांच्या जिवावर येत असे. कधीं कधीं त्या संध्याकाळच्या कपभर चहा घेअूनच रहात. कधीं अुपासतापासहि काढीत. शेजारच्या बिऱ्हाडांतून खमंग वास सुटला म्हणजे त्यांना वाटे, आपल्या घरांत आतां कधींच अशी माणसांची वर्दळ नाहीं का होणार? चुलीवर अशीं खमंग पदार्थांचीं पातेलीं नाहीं का चढणार? त्यांच्याकडेहि पाहुणेरावळे येत-जात; पण ते केवळ कांहीं घटकांचे सोबती असत. त्यांच्यासाठीं खपतांना, श्रमतांना अंतःकरणाला हुरळून जाअून गुदगुल्या होत नसत. भावांचीं बायकामुलेंहि सुट्टीला, सणासुदीला येत, त्यांनाहि आपल्याकडे बोलावीत; पण ही ये-जा कांहीं कायमचा आनंद निर्माण करूं शकत नसे. ह्या येण्याजाण्याची त्यांच्या जिवाला आंतून ओढ लागत नसे. ज्यांच्यासाठीं त्यांनीं स्वतःच्या जिवाचें पाणी केलें होतें असा त्यांचा स्वतःचा संसार आज कुठें होता? अितरांचे संसार त्यांनीं फुलविले होते; पण स्वतः मात्र त्या वैराण वाळवंटांतच अतृप्त अंतःकरणानें तडफडत राहिल्या होत्या!

* * *

ह्या वाळवंटांतच नंदनवन फुलविण्याची संधिहि काल चालून आली होती.

बरोबर हीच वेळ झाली होती. अशाच शाळेंतून त्या परत आल्या होत्या. असाच त्यांनीं चहासाठीं स्टोव्ह पेटविला होता. अितक्यांत दारावरची कडी वाजली. समोरच्या बिऱ्हाडांतले शंकरराव त्यांच्याकडे आले होते. गेले तीन महिने त्यांची थोरली सात-आठ वर्षांची मुलगी शकू वत्सलाबाअींकडे गणित शिकायला येत असे. मधली नलूहि कधींमधीं येअून 'माझा अभ्यास घ्या!' म्हणून हट्ट धरीत असे आणि धाकटा मधूहि 'मना गोत्त तांगा' म्हणून त्यांच्या गळयांत येअून पडत असे. ह्या तीन गोजिरवाण्या पोरांची आअी त्यांना सोडून दोन वर्षांपूर्वींच देवाघरीं गेली होती! त्या जागेंत रहाणें अत्यन्त दुःसह होअूं लागलें म्हणून सहासात महिन्यांपूर्वीं शंकरराव जागा बदलून वत्सलाबाअींसमोरच्या बिऱ्हाडांत रहावयास आले होते. आअीच्या प्रेमाला मुकलेल्या त्या तीन बछड्यांची दया येअून वत्सलाबाअींनीं आपणहूनच त्यांना माया लावली होती. तीं तीन मुलें त्यांच्याचकडे येअून नेहमीं धुमाकूळ घालीत. अधूनमधून शंकररावहि फेरी टाकून जात आणि शकूच्या

प्रगतीची चौकशी करीत. हळूहळू ओळख वाढत गेली, भाषेंतला अुपचार गळून पडला आणि मनमोकळ्या हंसण्याखिदळण्याची देवघेव होअूं लागली. अर्थात् वत्सलाबाअींनीं अेका विशिष्ट मर्यादेपलीकडे सलगी वाढूं दिली नाहीं. गप्पांचा घोळ वाढूं लागला कीं त्या मर्यादेनें नुसतें सौम्य हास्य करूनच प्रत्युत्तर देअूं लागत, कीं शंकररावांना समजे, आतां अुठायची वेळ झाली!

शंकररावहि तसा मोठा शहाणा माणूस होता. वत्सलाबाअींना खपणार नाहीं असल्या प्रकारची वागणूक त्यांच्या हातून कधींच घडली नव्हती; पण मोठ्या विश्वासानें आणि आपुलकीनें त्यांनीं आपलीं तीनहि बछडीं वत्सलाबाअींच्या ताब्यांत देअून टाकलीं होतीं. वत्सलाबाअींनीं त्या मुलांना जीवहि फार लावला आणि तें पाहून शंकररावांच्या मनांत अेक नवीन आकांक्षा निर्माण झाली. तिचा अुच्चार शब्दांनीं करून दाखविण्यासाठींच ते वत्सलाबाअींकडे संध्याकाळीं आले. वत्सलाबाअींनीं दिलेल्या चहाचे घुटके घेतां घेतां ते म्हणाले, "आज तुमच्या चहाचे चिमुकले वांटेकरी कुठें तरी रमलेले दिसताहेत बरं का!" विनयानें मान खालीं घालून वत्सलाबाअी म्हणाल्या, "हो, आज मुलं कुठें तरी खेळायला गेलीं आहेत वाटतं. तीं नसलीं कीं संध्याकाळीं कसं सुनं सुनं वाटतं!"

"तुम्हीं लळाच लावला आहे त्यांना तसा! अगदीं आअीची जागा भरून काढली आहेत तुम्हीं!" शंकरराव भरल्या आवाजांत अुद्गारले, "तुम्ही आहांत म्हणून मला अितकं तरी मोकळं मोकळं वाटतं. नाहीं तर ह्या पोरांची कांहीं धडगत नव्हती. दुसरं लग्न करायलाहि मन धजावत नव्हतं! असं वाटे, नीट मिळाली बायको तर ठीक; नाहीं तर विनाकारण त्या गरीब जीवांना त्रास! खरंच तुमच्यासारखी आअी असली म्हणजेच मुलांना सुख लाभतं! तुम्हीच आतां त्यांची आअी आहांत!"

तें वाक्य अैकतांच वत्सलाबाअींना शरमल्यासारखें झालें. किंचित् संकोचानें त्या जमिनीवर नजर लावून म्हणाल्या, "तुम्ही असं म्हणतां हा तुमच्या मनाचा मोठेपणा आहे! आअीचं प्रेम तें आअीचं प्रेम!"

'नाहीं, नाहीं, वत्सलाबाअी!' शंकरराव बोलले, "खरं, खरं सांगतों, त्यांच्या खऱ्या आअीपेक्षांहि तुम्हीं जीव लावला आहे त्यांना. त्या मुलांना

तुमच्यावांचून कधीं कधीं करमायचं नाहीं आतां!" मग ते किंचित् थबकले. वत्सलाबाओींच्या चेहऱ्यावरचे बदलणारे भाव निरखीत त्यांनीं विचारलें, "तुमच्याकडे अेक मागणं मागितलं तर राग नाहीं ना येणार? ओघानं विषय आलाय् म्हणून विचारतों. खरंच, काय हरकत आहे तुमची त्या मुलांची आअी व्हायला? माझा ढांसळलेला संसार तुम्ही आपल्या हातांत नाहीं का घेणार?"

तो प्रश्न वत्सलाबाओींना अगदींच अनपेक्षित नव्हता. मधूला अनेक वेळां पोटाशीं धरून कुरवाळतांना त्यांच्या मनांत ही आशा अचानकपणें चमकून गेलेली होती. नलूची वेणी घालून देतांना त्यांना कधीं कधीं वाटे, 'ह्या पोरांची मी खरीखुरी आअी असतें तर किती चांगलं झालं असतं! माझ्या कुशींतून नाहीं का असा अेखादा गोंडस जीव जन्माला येणार?' आणि असा विचार करतां करतां अेकदम शंकररावांची हंसतमुख मूर्ति त्यांच्या डोळ्यां-समोर अुभी राही; पण त्या चटकन् मनाला आंवरीत. त्या संयमानें मनाची चळवळ थांबे; पण मनाला खिन्नताहि वाटे. शंकररावांचा हा प्रेमळ प्रश्न अैकून त्यांच्या मनाला क्षणभर हुरळून आल्यासारखें झालें; पण त्यांच्या तोंडून चटकन् 'हो!' असा अुद्गार बाहेर पडेना. त्या किती तरी वेळ निःशब्दच राहिल्या. त्यांची अस्वस्थता जाणून शंकरराव चटकन् अुठले व खोलीबाहेर जातां जातां म्हणाले, "तुमची मनःस्थिति मी जाणतों; पण मला कांहीं घाअी नाहीं. वाटलं तर पहा विचार करून. तुमची तयारी असेल तर माझं घर केव्हांहि तुमचं समजायला हरकत नाहीं!"

आणि त्या क्षणापासून वत्सलाबाओींच्या मनांत तें दोन मनोवृत्तींचें भयंकर द्वंद्व सुरू झालें होतें. स्वतःचा संसार करण्याची हौस त्यांना पुढें ओढीत होती, तर ह्या वयांत हे अल्लड चाळे आपल्याला शोभणार नाहींत, ही लाज त्यांचा पाय मागें खेचीत होती. आतां आयुष्याच्या अुतरत्या काळांत त्यांना विश्रान्तीची, कुणाच्या तरी साहाय्याची आवश्यकता वाटत होती. म्हातारपणींच्या यातनांमध्यें अेकलेपणाची भर पडूं नये असेंहि वाटत होतें. शिवाय स्त्रीसुलभ आशाआकांक्षाहि पूर्ततेच्या क्षणाची अधीरतेनें वाट पहात होत्या. आतां तर अगदीं सोन्यासारखी संधिहि त्यांच्या पायांपाशीं चालून आली होती.

पण आतां तडफ अुरली नव्हती. आतां अुत्साह अुरला नव्हता. आतां नवलाअीचा आनंद अुपभोगण्याची कुवत अुरली नव्हती आणि आतां त्यांना ह्या जीर्ण होत आलेल्या देहाचे सोळभोग पुरविण्याची शरम वाटूं लागली होती. ज्या कालांत जिवाला हौस होती, त्या कालांत परिस्थितीनें त्यांना जखडून ठेवलें होतें. आतां परिस्थितीची कृपा झाली होती; पण जिवाची हौस सरली होती! शंकररावांचा संसार पुन्हां नव्यानें अुभारण्याची, त्यांच्यासाठीं कष्ट करण्याची इच्छा होती; पण ताकद मात्र नव्हती. हें आपल्याला साधेलच असा आत्मविश्वास आतां अुरला नव्हता. तो अुन्मत्त बेपर्वाअीचा काल कधींच संपून गेला होता. शिवाय आतां भोंवतालच्या दुनियेची पर्वा वाटूं लागली होती. आपलें स्थान, आपला मान ह्याची कदर आतां मनांत आलें तें करूं देत नव्हती. ही भीति त्यांना अधिक जाचत होती. 'म्हातारपण जवळ आलं अन् ह्या बाअीला आतां हे चाळे आठवले वाटतं?' असें लोक म्हणतील कीं काय, अशी शंका त्यांच्या अंतःकरणाचे चावे घेत होती.

आणि म्हणून कालची रात्र त्यांनीं अशी तळमळत जागून काढली होती. आज सकाळीं त्या अुठल्या तरीहि अंतःकरणांतली तगमग थांबली नव्हती. संध्याकाळीं शाळेंतून परत आल्यावरहि मनाची दोलायमान स्थिति कायम होती आणि तशा स्थितींतच त्या आतां धूळ खात पलंगावर पडल्या होत्या.

शेवटीं अगदीं दाट अंधार पडला तेव्हां त्या दिवा लावयला अुठल्या. बटण दाबतांच दिव्याच्या पिवळया लखख प्रकाशानें त्यांची चौकोनी खोली भरून गेली. मग त्यांच्या हृदयाची धडधडहि थांबली अन् चटकन् मनाला निर्णय सांपडला. भिंतीचा आधार घेअून त्यांनीं मस्तक किंचित् टेकलें आणि त्या स्वतःशीं अुद्गारल्या, 'नाहीं! ती गोष्ट आतां अशक्य आहे. जें पाहिजे होतें, तें मिळत आहे. पण अवेळीं—अगदीं भलत्या वेळीं! माझ्यासारख्या कातर मनाच्या स्त्रीला आतां तें साधणार नाहीं, जमणार नाहीं! जेव्हां योग्य वेळ होती तेव्हांच मीं तें करायला हवं होतं. आयुष्यांत संधि पाहूनच स्वार्थ साधायचा असतो. कारण अेकदां गेलेल्या घटका पुन्हां येत नाहींत. जेव्हां अैन वय होतं, हौस होती, तेव्हांच मीं स्वार्थ साधायला हवा होता; पण त्या वेळीं त्यागाच्या कल्पनेनें मी भारली गेलें होतें. आज मात्र मला माझी चूक कळली. ती हीच कीं, पूर्णपणें आपली आहुति देणें हाहि अेक गुन्हाच आहे.

माझ्या बलिदानावर अितरांनीं आपला पिंड पोसला; पण मीं एवढं बलिदान करायला नको होतं. मनुष्यानं अितरांसाठीं जगलं पाहिजे पण आधीं त्याला स्वतःसाठीं जगायला शिकलं पाहिजे. माझ्या आयुष्यांतली भरतीची लाट जशी आली तशीच गेली. केवळ शंख आणि शिंपले मागें टाकून आल्या पावलींच अुलटी परतून गेली. आतां तेच मोजत बसणें कपाळीं आलें आहे. शंकरराव, नाहीं तुमच्या मुलांची आअी होणं जमलं मला; पण तुमच्या संसाराची स्वामिनी होणं ह्या जन्मीं तरी मला शक्य नाहीं!'

'नवयुग'
३१ डिसेंबर १९५०



## न अुघडलेल्या खिडक्या : : ५

विडीच्या धुरानें खोली अगदीं कोंडून गेली होती. आधींच खोलीला असलेल्या तीनहि खिडक्या गोविंदरावांनीं बंद करून टाकल्या होत्या. खिडकी अुघडण्याची त्यांना कधीं संवयच नव्हती. सूर्यप्रकाशाला त्यांच्या खोलींत मुळीं जागाच नव्हती. त्या बंद खोलींत ते मख्खपणानें तासन् तास बसून राहात आणि बसल्या बसल्या विड्यांचीं बंडलें चटाचटां अुडवून टाकीत. विडींच्या धुरकट अुग्र वासाची त्यांना अितकी संवय पडली होती कीं, बाहेरच्या खुल्या वातावरणांत त्यांचा जीव गुदमरूं लागे. चार भिंतींमध्यें गेलीं साठ वर्षें त्यांनीं स्वतःचा देह कोंडून घेतला होता आणि देहामध्यें आपला आत्माहि कोंडून घेतला होता. वय वाढत गेलें होतें. काल भराभर अुलटून चालला होता. जगाची घडीहि नवनवे आकार घेत होती. भोंवतालचीं माणसें वेगानें बदलत चाललीं होतीं. विचारांना नवनवीन वळणें लागत होतीं; पण गोविंदरावांच्यांत काडीमात्र फरक पडला नव्हता. अेखाद्या पडलेल्या-झडलेल्या जीर्ण स्तंभाप्रमाणें ते होते तिथेंच ठाण मांडून राहिले होते. बदलत्या जमान्याकडे पाठ फिरवून ते आपल्या दारिद्र्यांतच जिभल्या चाटीत बसले होते. त्यांना जगाची पर्वा नव्हती. त्यांना अितरांची फिकीर नव्हती. स्वतःच्या क्षुद्र आणि भिकार जीवनावरच ते प्रेमानें टक लावून बसले होते. स्वतःखेरीज दुसऱ्याचा विचार करण्याची त्यांना अिच्छाच नव्हती मुळीं. रात्रंदिवस मी, मी आणि मी! ह्या अेकाच शब्दाची जपमाळ मोजीत बसले होते. आयुष्य म्हणतां म्हणतां पायांखालून निसटून गेलें होतें, तरी गोविंदराव अजून चांगले दिवस येण्याचीच वाट पहात होते.

सकाळ झाली म्हणजे ते आपली वळकटी गुंडाळून कोपऱ्यांत ठेवीत आणि सतरंजी अंथरून त्या वळकटीला पाठ लावून चहाची वाट पहात बसत. हा फुरसतीचा वेळ विड्या फुंकण्यांतच जाअी. जराशीं अुन्हें आलीं म्हणजे त्यांची बहीण माअी चहा घेअून येअी. चहा गार असला तर गोविंदराव तो गरम पाहिजे म्हणून कुरकूर करीत. गरम असला कीं धुसफुसत. तो गार होण्याची वाट पहात बसत. कधीं त्यांना तो फार गोड लागे, तर कधीं त्यांत साखरेचा कण सुद्धां नसल्याची त्यांची तक्रार असे. चहाच्या वेळीं त्यांचें आणि माअींचें भांडण झालें नाहीं असें क्वचित् होअी. माअी त्यांच्याहून दीडच वर्षानें लहान होती. गोविंदरावांप्रमाणें तिचेंहि लग्न झालें नव्हतें. अर्धशतकाच्या वर आयुष्य दोघांनीं अेकमेकांच्या संगतींत काढलें होतें. दोघांचें क्षणभर देखील पटलें नव्हतें. गेलीं कित्येक वर्षें तीं अेकमेकांचीं कपाळावर आंठ्या चढलेलीं तोंडें पहात होतीं आणि दोघांनाहि अेकमेकांची अत्यन्त शिसारी आली होती. गोविंदरावांचें अंतःकरण माअीबद्दलच्या द्वेषानें कांठोकांठ भरलें होतें आणि माअीलाहि गोविंदरावांबद्दल गाढ तिरस्कार वाटत असे; परंतु ही वैराची भावना दोघांच्याहि मनांत अितकी खोल रुजली होती कीं, रोज हें विष चाखल्यावांचून त्यांना करमत नसे. परस्परांबद्दलचा तिटकारा व्यक्त करण्यास दोघेंहि कावेबाजपणानें संधि शोधीत असत आणि धुरकटलेल्या अंतःकरणांतील ही राख झाडून टाकतांना त्यांना मनस्वी आनंद होत असे.

गोविंदरावांच्या विसाव्या वर्षींच त्यांच्या आअीला भयंकर आजार झाला आणि ती मरण पावली. त्या धक्क्यानें भ्रमिष्ट होअून वडीलहि सहा महिन्यांत आटोपले. वडिलांनीं थोडीबहुत पुंजी सांठवून घर तेवढें बांधून ठेवलें होतें. त्याच्या भाड्यावरच गेलीं चाळीस वर्षें गोविंदराव गुजराण करीत होते आणि अितकी सोय वडिलांनीं करून ठेविली असतांनाहि रोज त्यांच्या नांवानें बोटें मोडीत होते.

काहीं उद्योगधंदा करून स्वतःच्या श्रमानें पोट भरण्याचा गोविंदरावांना कंटाळा होता. स्वतःच्या अंगांत लायकी नाहीं ही गोष्ट ते कधींच कबूल करीत नसत. त्यांचें आयुष्य असें वांया गेलें त्याला कारण जग होतें! त्यांचे वडील होते! त्यांची आअी होती! आणि त्यांची बहीण होती!

नोकरी करण्याची त्यांची अिच्छा नव्हती. कारण कुणाच्याहि हाताखालीं काम करणें त्यांना आवडत नव्हतें. त्यांच्याहून नालायक माणसानें त्यांच्यावर सत्ता गाजवावी हें त्यांच्या प्रकृतीला मानवणारें नव्हतें. कांहीं स्वतंत्र धंदा करावा तर तोट्याचा धोका कोण पत्करणार? शिवाय जग सगळें लुच्चासोद्यांनीं भरलें असल्याकारणानें आपल्यासारख्या भोळ्याभाबड्या माणसाला कुणीहि फसवूं शकेल अशी त्यांची ठाम समजूत होती. आपल्या हुशारीची त्यांना फार घमेंड होती. कुणीं तरी अेकदां त्यांना सुचवलें, 'गोविंदराव, अेवढ्या प्रखर बुद्धिमत्तेचे तुम्ही, मग कांहीं लिखाण कां करीत नाहीं ?' विडीच्या धुराचा अेक भपकारा सोडून त्यांनीं अुर्मटपणें अुत्तर दिलें होतें, 'अहो, मी लाख लिहीन, पण तें समजण्याची लायकी आहे का? सगळा मूर्खांचा बाजार आहे झालं !'

कोठल्याहि गोष्टीचा अुणेपणा जर त्यांना कुणीं दाखविला तर ते ताबडतोब आपल्या वडलांचा अुद्धार करीत. प्रत्येक दोषाला कारण जणुं त्यांचा बापच होता. कुणी तरी त्यांना अेकदां विचारलें, 'काय गोविंदराव, काय दोनाचे चार हात करायचा विचार आहे कीं नाहीं ?' दांतांत धरलेलें सुपारीचें खांड थुंकून ते अुद्गारले, 'अहो, आमचं पहायला कोण आहे? आमच्या तीर्थरूपांना आमची फार काळजी! त्यामुळें हीं सगळीं कामं अशीं अर्धवट टाकून ते चालते झाले; त्याला आम्ही काय करणार ?'

कधीं कधीं भांडण अगदीं अेकेरीवर आलें म्हणजे माअी तळतळून म्हणत, 'मेल्या, स्वतःचा नाश केलास तो केलास आणि फिरून माझंहि तुळपट केलंस!' आढ्याकडे नजर लावून लोळत पडलेले गोविंदराव ताडकन् अुठून बसत आणि आपली लालभडक तारवटलेली दृष्टि माअीवर लावून म्हणत, 'अग सटवे, माझ्या घरांत राहून परत मला अुलटून बोलतेस? अेवढं होतं मनांत तर कां नाहीं पळून गेलीस अेखाद्या ठोल्याचा हात धरून? मीं थोडीच बांधून ठेवली होती तुला? आपलंच लोढणं माझ्या गळ्यांत घातलंस, माझा चक्काचूर केलास आणि परत तोंड वर करून मलाच म्हणतेस कीं मीं तुझं तळपट केलं म्हणून!'

तरुण वयांत माअी बऱ्या दिसत असत. संसार करण्याची त्यांची अिच्छा अगदीं स्वाभाविकच होती. त्यांची सारी जबाबदारी खरी गोविंदरावांवरच

नव्हती काय ? परंतु माअींनीं सुखांत पडावें ही कल्पनासुद्धां गोविंदरावांना सहन होत नसे. स्वतःचें स्वतः अुरकून घेण्याची धमक त्यांच्यांत नव्हती. त्यांना वाटे, कोणी तरी मोठा लक्षाधीश आपली देखणी मुलगी घेअून अेके दिवशीं आपल्या दाराशीं येणार आहे; पण गोविंदरावांचा तिरसट व घमेंडखोर स्वभाव साऱ्या गांवाला माहीत असल्यानें कुत्रेंसुद्धां त्यांच्या दारांत फिरकत नसे. स्वतःचें कांहीं जमत नाहीं म्हणून ते माअीचेंहि कांहीं जमवीत नव्हते.

कुणाहि तरुण पुरुषाकडे माअींनीं वर दृष्टि करून पाहिलेलें त्यांना खपत नसे. माजघरापलीकडे माअींचें पाअूल कित्येक महिने पडत नसे. बाहेरच्या खोलींत डोळे वटारून आणि नाक फेंदारून अेखाद्या शिंगाड्या बैलोबा-प्रमाणें गोविंदराव बसलेले असत. माअीचें पाअूल जरा पुढें पडण्याचा अवकाश, कीं गोविंदराव त्यांना डसायला अुठलेच म्हणून समजा !

अेकदां कुठें माअी गोविंदरावांची नजर चुकवून बाहेरच्या ओटीवर आल्या आणि मन रिझवायला रस्त्यावरची गंमत पहात उभ्या राहिल्या. भाजीची झोळी हातांत घेअून गोविंदराव फाटकांत शिरले तों त्या आंत पळाल्याहि; पण गोविंदरावांच्या ध्यानांत तें आलें. आंत येतांक्षणीं हातांतली कांदेबटाट्यांनीं भरलेली पिशवीच त्यांनी माअीच्या तोंडावर फेंकली आणि माजघराच्या दाराला जें कुलूप घातलें तें महिनाभर कांहीं अुघडलें नाहीं ! कामापुरते ते आंत जात आणि बाहेर येतांक्षणींच कडीवर कुलूप लावून टाकीत. ह्याखेरीज शिव्यांची लाखोली तर रोज चाललेलीच असे. " तुला कुळाची लाज नाहीं, भावाची भीड नाहीं ! खुशाल आपली बाजारबसवीसारखी बाहेर येअून अुभी राहिलीस ! कोण पहायला येणार होतं तुझं हें दळभद्रं रूप ! कांहीं वयाची चाड ? कांहीं जनाची लाज ? मला माहीत आहे, तूं माजत चालली आहेस. तुझ्या मनांत घाणेरड्या वासना भरल्या आहेत. देवधर्म करीत आंत बसायचं तें तुला हे पुरुषासमोर नाचण्याचे धंदे कुणीं शिकवले ? "

रडून रडून माअींचे डोळे कोरडे पडले; पण गोविंदरावांच्या जिभेला कांहीं कंटाळा आला नाहीं !

आपण स्वतः मात्र सत्पुरुष आहोंत, परमेश्वराचेच अवतार आहोंत अशी त्यांची ठाम समजूत होती. संसार न करतां आपण पवित्र मनानें आयुष्य

घालवलें म्हणून स्वतःचें त्यांना कोण कौतुक वाटत असे! आपल्या संयमाबद्दल त्यांना केंवढा अभिमान वाटत असे! परंतु नालायक जगाला आपली किंमत कळत नाहीं ह्याचा त्यांना तितकाच खेदहि होअी. अेवढ्या लोकांचा जगांत गौरव होतो आणि आपल्याला कुणी खिजगणतींतहि धरत नाहीं ह्याची त्यांना अत्यंत चीड येअी. आपल्यासारख्या साधुपुरुषाचा समाजाला विसर पडावा ह्याचें त्यांना अतिशय वैषम्य वाटे आणि म्हणूनच अितरांचा गौरव अैकतांना त्यांच्या कानांत जणुं कुणीं विष ओतावें अितकें त्यांना दुःख वाटे. आजपर्यंत गोविंदरावांच्या जिभेनें कुणाचें कौतुक केलें नव्हतें. मात्र अुपहासाचे शब्द कांट्यांसारखे त्यांच्या जिभेवर सलून बसलेले असत. शेजारच्या माधवरावांचें लग्न वयाच्या मानानें जरा अुशीरां झालें तर गोविंदराव म्हणाले, "अेवढा अेरंडासारखा लेकाचा वाढलाय; पण संसाराचा लोभ कांहीं सुटला नाहीं लेकाला!"

माणसांचा त्यांना मनस्वी तिटकारा होता. शेजाऱ्यापाजाऱ्यांकडे त्यांचें येणें-जाणें नव्हतें. कुणाची पायरी चढण्यांत त्यांना मुळीं कमीपणाच वाटत असे. बरें, दुसरें कुणी त्यांच्याकडे आलें तर गोविंदराव त्यांच्याशीं असे कांहीं चमत्कारिकपणानें वागत, कीं फिरून गोविंदरावांचें तोंड पहाण्याची त्याला अिच्छा होअूं नये. अेक तर ते स्वतःचेच पोवाडे गात बसत, नाहीं तर अितरांची कुत्सितपणें टिंगल करीत बसत. माणसांची रहदारी नसल्यानें गोविदरावांचें घर कसें ओसाड, भकास, अुदासवाणें दिसत असे!

फक्त गोविंदराव आणि माअीच त्या घरांत भुतासारखीं वावरत. तासन् तास ते आपल्या खोलींत अेक शब्दहि तोंडांतून न काढतां धुंभासारखे बसून रहात. गोविंदराव विड्या ओढीत बसत. माअी पिकलेले केस अुपटीत बसत. घरामध्यें कधींकाळीं घेअून ठेवलेला अेक मध्यम आकाराचा आरसा होता. त्यावर धूळ चढून चढून तो अितका मलिन झाला होता, कीं त्यांत डोकावणाऱ्या माणसाला स्वतःचें भेसूर प्रतिबिंब पहातांना क्षणभर भीति वाटल्यावांचून राहिली नसती. त्या आरशासमोर बसून माअी आपल्या अुडून गेलेल्या तारुण्याचा शोध लावीत बसत. तरुण वयांत आपण चांगल्या दिसत होतों, ही जाणीव त्यांच्या मनांत अजूनहि ताजीच होती. अेखाद्या वठून गेलेल्या, किडलेल्या, सडलेल्या वृक्षानें तळागतच्या गढूळ डबक्यामध्यें

आपल्या पूर्ववैभवाची खूण शोधण्याकरितां डोकावून पहावें, तशा त्या धुळकटलेल्या आरशामध्यें माअी आपली भकास नजर लावीत. बघतां बघतां डिंवचलेल्या अळीप्रमाणें भूतकालच्या आठवणी वळवळूं लागत. गोविंद-रावांबद्दलच्या वैरभावनेला धार चढूं लागे आणि मग त्यांची धुसपूस सुरू होअी.

गोविंदरावांना जेवणांत मीठ जरा कमीच लागे म्हणून मुद्दाम त्या खारट स्वयंपाक करीत. गोविंदरावांना फडफडीत भात लागे तरी त्या भात अोलासर्द करून ठेवीत. पहिला घांस तोंडांत घालतांक्षणीं गोविंदरावांची तिरसट बडबड सुरू होअी, " जन्मभर स्वयंपाक करीत आलीस अन् अजून तुला मिठाचा अंदाज नाहीं ? हा काय स्वयंपाक आहे का काय आहे ? माझ्या अन्नांत विष कां कालवतेस ? कोण बहीण आहेस कीं मागल्या जन्मींची वैरीण ? का यायचा होता अेखादा ' कोणी ' तुझ्या हातची भाकर खायला ? "

गोविंदराव असें कांहीं बोलूं लागले म्हणजे माअी त्वेषानें अुसळून म्हणत, ' अवढं बकाणतो आहेस माझ्या हातचं आणि असं बोलवतं तरी कसं तुझ्याच्यानं ? तुझ्या पायीं चुलींतली राख डोक्यांत घेअून बसलें जन्मभर अन् माझं कुलशील काढतोस ? का तुझीच अेखादी सटवी यायची आहे माझ्या अुरावर बसायला ? '

बोलतां बोलतां भांडण अगदीं अति वाढलें म्हणजे गोविंदराव चाटून चाटून साफ केलेलें ताट लाथेनें अुडवीत, पाट भिंतीवर फेकून देत आणि खकारे काढून काढून तोंड धूत बसत. माअी देखील चुलीवरल्या रिकाम्या भांड्यांत पळी वाजवीत ; नाहीं तर चुलीमधल्या राखेवर जीव काढून फुंक मारीत बसत. अशा भांडणानंतर नेहमींचा अबोला अधिकच तीव्र होअी. घरांतलें कोंदट वातावरण तिखट तुटकपणानें माखून जाअी. डोक्यावरती घोंगडी घेअून माअी स्वयंपाकघरांत घुसमटत पडत. विडीच्या धुराचा श्वासोच्छ्वास करीत गोविंदराव वळकटीला टेकून बसत. क्षणामागून क्षण असेच अुलटून जात. अेकमेकांबद्दलचा तिटकारा मनांतल्या मनांत घुसळीत तीं दोघेंहि तासचे तास घालवीत.

गोविंदरावांना वाटे, माअीमुळें आपला नाश झाला, माअीला वाटे गोविंदरावांनीं आपल्या जीवनांत विष कालवलें. भांडणांमागून भांडणें होत

गेलीं होतीं आणि जहरी भावना अधिकाधिक काळवंडून गेल्या होत्या. क्षणभर सुद्धां अेकमेकांचें तोंड पाहण्याची त्यांची अिच्छा नव्हती; पण त्या वैरी सहवासाची त्यांना अितकी संवय पडली होती कीं, अेकमेकांकडे खुनशी नजरेनें टवकारून पाहिल्याखेरीज त्यांच्या डोळयांचें पारणें फिटत नसे. भांडण हेंच त्यांचें जीवनसर्वस्व होअून बसलें होतें. त्यांच्या थिजलेल्या जीवनांत तेवढीच काय ती हालचाल होती; तेवढाच काय तो त्यांच्या मनाला विरंगुळा होता. विरोधी अर्थानें त्यांना अक्षरशः अेकमेकांवांचून करमत नसे.

आणि म्हणूनच असें अेखादें भांडण निघालें म्हणजे त्यांना कोण आनंद होत असे! अेकमेकांना कडकडून शिव्या देतांना त्यांच्या जिभेला केवढी धन्यता वाटत असे!

अशा संध्याकाळीं माअी चुलीला वाटाण्याच्या अक्षता देत. अन्नपाणी न मिळाल्यानें त्यांच्या पोटांत कोण कालवाकालव होअी! पण हट्टानें तशा त्या डोळयांवर घोंगडी ओढून तळमळत पडत. अशा वेळीं गोविंदराव चुलीचा ताबा आपल्याकडे घेत. भांडेंभर खिचडी अुकडून ते ती अधाशा-सारखी बकाणत. खरकटीं भाडीं तश्शीं पडत. चुलींतला निखारा तस्सा धगधगत राही. खोलीभर बागुर्डी अुडत. जमिनीवर अुंदीरही नाचत; पण माअींना त्याची मुळींच दाद नसे. त्या अिकडे तळमळत पडत, तर गोविंद-राव तिकडे पाय तणावून घोरायलाहि लागत. अनेक रात्री अशाच अुलटून गेल्या होत्या. हीहि रात्र अशीच अुलटून जाअी.

हळूहळू सकाळ अुजाडे. गोविंदराव वळकटी गुंडाळून ठेवीत आणि चहाची वाट पहात विड्या अुडवीत रहात.

हें चक्र अव्याहत चाललें होतें. अजून संपलेलें नव्हतें आणि आणखी किती दिवस चालणार होतें तें फक्त देवाला माहीत!

'नवयुग'
२४ जून १९५१

* * *

# पराभव : : ६

संध्याकाळचे सहा वाजून गेले होते; परंतु अुर्मिलाबाअी आरामखुर्चीवर तशाच निश्चलपणें टेकून पडल्या होत्या.

तासामागून तास अुलटून गेले होते; परंतु अेखाद्या निर्जीव पुतळीप्रमाणें त्या खुर्चीला पाठ लावून बसल्या होत्या. समोरच्या खिडकीला टांगलेला पिवळा तलम पडदा वाऱ्यानें जरा हेलकावत होता. तेवढीच काय ती त्या खोलींत हालचाल होती. तो जरा अुंच झेपावला म्हणजे मावळतीवर चढलेला गुलमोहरी रंग अुर्मिलाबाअींना स्पष्ट दिसे. तांबड्या भडक रंगानें माखलेल्या पश्चिम आकाशावर अेक लांबच्च लांब काळाकुट्ट ढग येअून थबकला होता. अुर्मिलाबाअींना वाटलें, अेखाद्या रक्ताळलेल्या डोहांत अुन्मत्तपणें पहुडलेली आक्राळविक्राळ सुसरच तर पहात नाहीं ना आपण!

हळूहळू तो ढग विरळ विरळ होत जाअून विस्तारूं लागला. भली मोठी आग विझत यावी आणि तिच्यावर धुराचे लोळ साकळून रहावेत तसें कांहींसें रुद्ररम्य दृश्य पश्चिमेकडे अुमटून राहिलें.

तो धुरकटलेला मेघाचा विस्तार पहातां पहातां अुर्मिलाबाअींच्या छातींत अेकदम धस्स झालें. त्यांना वाटलें, त्या धुरांतून अेकदम अेक पिवळी तांबडी ज्वाला भडकली आणि त्या ज्वाळेंतून तेजानें न्हाअून निघालेली श्यामलेची अुंच बांधेसूद आकृति बाहेर पडली. धीमेपणानें अेकेक पाअूल टाकीत अवकाशाचें सारें अंतर तोडून ती थेट आपल्यासमोर येअून अुभी राहिली आणि आपली भेदक नजर रोखून म्हणाली, ‘ अुर्मिलामावशी, स्वार्थानं तूं आंधळी झाली आहेस. मग तुझा पराजय तुला कुठून दिसणार? प्रत्येक

डाव मी जिंकणार असा हट्ट बाळगल्यामुळें तुझ्या अंतःकरणांतल्या साऱ्या कोमल भावनांची राखरांगोळी झाली आहे! पण अुर्मिलामावशी, मला तुझा राग येत नाहीं, अुलट दया मात्र येते. कारण तुझा शेवट किती भयंकर होणार आहे हें अजूनहि तुला अुमगलेलं नाहीं. मावशी, जागी हो, अजूनहि वेळ गेलेली नाहीं. जागी हो मावशी, डोळे अुघड!'

बोलतां बोलतां तिची आकृति अस्पष्ट झाली, पण तिचें तें शेवटचें वाक्य मात्र किती तरी वेळ घुमत राहिलें. त्याचा कोलाहल असह्य होअून अुर्मिलाबाअींनीं कानांवर हात दाबून धरले आणि मांडीवर घेतलेल्या अुशी-मध्यें डोकें खुपसलें. हा अनुभव त्यांना नवा होता. ही असहाय्यता, ही विकलता आजपर्यंत त्यांनीं अनुभवली नव्हती. ही शिथिलता त्यांना माहीत नव्हती. विकारांच्या पेटत्या आगींत धगधगण्याची त्यांना संवय होती. त्यांच्या रक्तांतल्या प्रत्येक बिंदूमध्यें तामसी चटका भरला होता; पण हा निर्जीव कलेवरांतला थंडपणा त्यांनीं कधीं कधींहि अनुभवलेला नव्हता आणि कदाचित् त्याच थंड विकलतेंत त्यांचें अुरलेलें सारें आयुष्य निघून जाणार होतें.

दहा वर्षांपूर्वी ज्या वेळीं श्यामलेनें त्यांच्या घरांत प्रथम पाअूल टाकलें त्या वेळीं त्यांना कल्पनाहि नव्हती कीं, तिच्यामुळें आपल्या आयुष्याचा रंग अेवढा बदलणार आहे. श्यामला ही अुर्मिलाबाअींच्या दूरच्या अेका विधवा बहिणीची मुलगी होती. त्यांची बहीण मोठ्या आजारानें अंथरुणाला खिळली आणि मग तिला वाटलें, आतां कांहीं आपण जगत नाहीं. अुर्मिलाबाअींना पत्र पाठवून तिनें श्यामलेचा संभाळ करण्याची विनंति केली.

अुर्मिलाबाअींना नाहीं म्हणवेना. तिच्या मृत्यूनंतर दहाबारा वर्षांची अनाथ श्यामला अुर्मिलाबाअींकडे रहावयास आली.

श्यामलेच्या आअीचा नाअिलाजच झाला म्हणून, नाहीं तर अेरवीं तिनें श्यामलेला त्यांचें चुकून दर्शनहि होअूं दिलें नसतें. कारण अुर्मिलाबाअींचें चरित्र तसेंच लोकविलक्षण होतें.

अुर्मिलाबाअींचा बाप अेक अट्टल जुगारी होता. लक्षावधि रुपये त्यानें लीलेनें खेळविले होते; पण त्याच्या आयुष्यांतला जुगार यशस्वी ठरला होता. अफाट संपत्तींत सुखासमाधानानें लोळतां लोळतांच त्यानें प्राण

सोडला. ज्या घरांत सचोटी आणि प्रामाणिकपणा मुळीं माहीतच नव्हता, ज्या घरांतलें जीवन डावपेचांनीं भरलेलें होतें, अशा घरांत अुर्मिलाबाअी लहानाच्या मोठ्या झाल्या. सर्वस्व पणाला लावून लढण्याचें धोकेबाज धाडस त्यांच्या रक्तांतच मुरलें होतें. लढा हरण्याची त्यांना संवयच नव्हती. यशाच्या अुन्मादाची त्यांना चटक लागली होती.

लक्ष्मीची त्यांच्यावर नेहमींच कृपा होत गेली. त्यांचें लग्नहि एका अिस्टेटवाल्या धनाढ्य खुशालचेंडूशीं झालें. पुढें बापहि वारला आणि नवराहि वारला. दुसरें कुणीहि वारस नसल्यामुळें सारी संपत्ति अुर्मिला-बाअींच्या हातांत आली. यापुढें त्या संपूर्णपणें स्वतंत्र झाल्या.

अिथूनच अुर्मिलाबाअींचें तें भयंकर धाडसी जीवन सुरू झालें. चांदीचीं नाणीं खेळविणाऱ्या त्यांच्या सराअीत हातांना यापुढें माणसें खेळविण्याची चटक लागली. श्रीमन्त लोकांच्या सर्व वर्तुळांमध्यें त्या आकर्षणाचा मध्यबिंदु होअून बसल्या. झडप घालणाऱ्या नागिणीसारखी त्यांची ती पिवळीधमक नजर नुसत्या अेका दृष्टिक्षेपानें बघणाऱ्याला जायबंदी करून टाकीत असे. त्यांच्या भुवयांचीं टोंकें अुंचावलीं असल्याकारणानें नजरेंतला अुर्मटपणा अधिकच अुग्र भासत असे. झगमगता पोषाख करून संथपणानें अेकेक पाअूल मोजून - मापून टाकीत. त्या अेखाद्या हॉलच्या दारांतून आंत शिरल्या म्हणजे प्रत्येक व्यक्तीन् व्यक्ति नजरबंद होअून स्तिमितपणें त्यांच्याकडे टवकारून पाहूं लागे. त्यांच्या हुकमी नजरेला नजर भिडतांच पहाणाऱ्यांची दृष्टि आपोआपच त्यांच्या जरतारी पट्टयांनीं वेढलेल्या गोऱ्यापान पावलांकडेच वळे.

त्यांना खुष ठेवण्यासाठीं प्रत्येक जण धडपडे. अचूक डाव साधून गारुड्यानें मुठींत नागाचा फणा पकडावा अन् विकटपणें खदखदां हंसत त्याची निष्फळ तडफड पहावी, तशा त्या आपली मर्जी संभाळण्यासाठीं चाललेली लोकांची धांवपळ मोठ्या समाधानानें पहात. मनांतल्या मनांत हे लोक चडफडतात हें त्यांना पूर्ण माहीत होतें. आपली पाठ वळतांच ह्या लोकांच्या कपाळावर आंठ्या चढतात हें त्या जाणून होत्या.

आणि म्हणूनच त्यांच्यावर हुकमत चालवतांना आणि त्यांची घमेंड जिरवतांना त्यांना कोण आनंद होअी ! संपत्ति आणि सौंदर्य या दोन हुकमी अेक्क्यांच्या जोरावर त्यांनीं प्रत्येक डाव आत्मविश्वासानें जिंकला होता.

यशाचें अुन्मादक मद्य सतत चाखत राहिल्यामुळें त्यांचें लावण्य अजूनहि टवटवीत राहिलें. आज चाळीस वर्षांचें वय होतें त्यांचें; परंतु त्यांचा चेहरा अजूनहि अुमलत्या गेंदेदार गुलाबासारखा अुत्फुल्ल होता. सौंदर्यप्रसाधनांच्या सहाय्यानें त्यांनीं चेहऱ्यावर आलेला थोडाफार प्रौढपणाहि लोपवून टाकला होता.

आपला राजमहाली थाटाचा भव्य बंगला त्यांनीं हजारों रुपये खर्चून सजविला होता. त्या बंगल्यांत अेखाद्या सुरस आणि चमत्कारिक गोष्टींतल्या चेटकिणीसारख्या त्या वावरत. कुठल्या तरी मंत्रानें भारून टाकल्याप्रमाणें घरांतलीं नोकरमाणसें निःशब्दपणें सगळीं कामें पार पाडीत. अुर्मिलाबाअींचा अेकेक शब्द म्हणजे चाबकाच्या मर्मभेदी फटकाऱ्याप्रमाणें वाटे त्यांना. कामामध्यें जरासुद्धां आगाळिक केलेली अुर्मिलाबाअींना रुचत नसे. त्यांच्याकडे नोकरीला असणाऱ्या अेका तरुण मोलकरणीच्या हातून अेकदां पाण्याचा ग्लास जरा हिंदकळला आणि अुर्मिलाबाअींच्या रेशमी साडीवर थोडेसे शिंतोडे अुडाले, तर ताडकन् अुठून त्यांनीं तिच्या नाकावर अेक सणसणीत चपराक मारली होती. त्यांच्याजवळ यायला मुळीं ती आधीं भीत असे. त्यांतून त्या दिवशीं सकाळपासून अुर्मिलाबाअींची मनःस्थिति जरा बिघडली होती. तिनें त्यांच्या खोलींत पाअूल टाकतांच त्यांनीं असा कांहीं जळजळीत दृष्टिक्षेपच तिच्याकडे फेकला होता कीं जणुं काय तिच्यामुळेंच त्यांना अेवढा मानसिक त्रास सहन करावा लागत होता. ती बिचारी भेदरली आणि ग्लास देतांना तिचा हात जरासा थरथरला.

अुर्मिलाबाअी शिस्तीच्या भोक्त्या होत्या म्हणून त्या असें वागत अशांतला भाग नव्हता; परंतु माझा अेक शब्द पाळण्यासाठीं हीं क्षुद्र माणसें किती धडपडतात हें पहातांना त्यांच्या जिवाला अतिशय मौज वाटे. म्हणून त्या आपल्या पायांशीं असे बंदे गुलाम बाळगून होत्या.

अुर्मिलाबाअींनीं जिव्हाळा असा कोणालाहि लावला नव्हता. त्यांना दुसऱ्याचा अनुनय करण्याची संवय नव्हती. त्यांची जात मानिनीची होती. प्रेम करवून घेणें त्यांना आवडत असे. प्रेम करणें त्यांना पसंत नव्हतें. आत्मगौरव त्यांना अधिक प्रिय होता आणि सोन्याच्या प्यालयांतलें विषसुद्धां

पिणाऱ्या माणसांची जात जोंवर त्यांच्या भोंवतालीं आशाळभूतपणें घुटमळत होती, तोंवर माणसें जिंकण्यांत त्यांना असाच जय मिळत जाणार होता.

दहा-बारा वर्षांच्या कोंवळ्या श्यामलेनें जेव्हां त्यांच्या घरांत प्रवेश केला तेव्हां क्षणभरच त्यांच्या फत्तरी काळजाला वात्सल्याचा ओला स्पर्श झाला होता; परंतु क्षणभरच! अेका दहाबारा वर्षांच्या दरिद्री पोरटीचें कौतुक करावयास त्यांचें मानी अंतःकरण तयार होअीना. लाडांत येअून लाघवी श्यामलेनें जेव्हां त्यांच्या दंडाला डोकें घासलें तेव्हां तिच्या ओलावलेल्या ओठांचा ओझरता स्पर्श त्यांच्या दंडाला जाणवला; परंतु तो त्यांना सुखकर वाटला नाहीं. अुलट त्यांना किळसच वाटली. तिच्या निकटपणाची त्यांना शिसारी आली. सगळ्यांचें लक्ष आपल्याकडे खेंचून घेण्याची संवय असलेल्या अुर्मिलाबाअींना ह्या चिचुंद्रीकडे लक्ष देण्यांत कमीपणा वाटला. त्या तिच्यावर अेकदम कडाडल्या, "माझ्या खोलींत पाअूल टाकशील तर खबरदार! आणि पुढच्या व्हरांड्यांत आणि दिवाणखान्यांत आलीस तर याद राख! माझ्याकडे मोठमोठीं माणसं येतात तेव्हां तुला मध्यें लुडबुडण्याचं कांहीं अेक कारण नाहीं. मागच्या नोकरांच्या खोलींत तुझी जागा. कुठल्याहि वस्तूला हात लावायचा नाहीं. माझ्या घरांत रहायचं असेल तर माझा प्रत्येक हुकूम पाळला पाहिजे, समजलीस?"

त्या दिवसापासून श्यामला फिरून कांहीं त्यांच्याशीं बोलायला गेली नाहीं. अुर्मिलाबाअींच्या क्षणभराच्या सहवासानें ती पार बदलून गेली. तिच्यांतलें बालसुलभ कुतूहल केव्हांच नष्ट होअून गेलें. त्या हंसाबागडायच्या वयांत तिच्या चेहऱ्यावर प्रौढ भाव अुमटूं लागले. भिंतीलगत अेखादें मेज अगर खुर्ची ठेवलेली असावी त्याप्रमाणें निर्जीवपणें ती त्या घरांत कुठें तरी कोपऱ्यांत दडून असे. अशा स्थितींतच नअूदहा वर्षें अुलटून गेलीं; पण यौवनाची चाहूल श्यामलेला लागली नाहीं. अेखाद्या विरक्त संन्यासिनीप्रमाणें तिची मुद्रा निर्विकार राहिली होती. अुर्मिलाबाअींनीं तिला जगाचा संपर्क म्हणून लागूं दिला नव्हता. तिचें शिक्षण घरींच अेका रुक्ष म्हाताऱ्या बाअीच्या हाताखालीं झालें होतें. घरांतलीं सटरफटर कामें करण्यांत तिचा सारा वेळ निघून जाअी. वेळ सांपडला कीं जें हाताला येअील तें ती वाचूं लागे आणि अुरलासुरला वेळ कुठलीं तरी गूढ स्वप्नें रचीत ती घालवी.

अुर्मिलाबाअींना तिचें अस्तित्वसुद्धां कधीं जाणवलें नाहीं. तिच्याबद्दल त्यांच्या मनांत चुकूनहि विचार येत नसे; परंतु अेके दिवशीं अशीच वेळ आली कीं आजपर्यन्तची सारी दुनियाच अेकदम अुलथीपालथी होअून गेली.

त्या रात्रीं त्यांच्याकडे दोनतीन बडी मंडळी जेवावयास येणार होती. ही मंडळी नेहमीं येणारीच होती; परंतु अेका व्यक्तीच्या येण्याकडे अुर्मिलाबाअींचें विशेष लक्ष लागलें होतें. कर्नल माधव आणि अुर्मिलाबाअींची ओळख अगदीं अलीकडची होती. माधव तीसबत्तीस वर्षांचा अविवाहित देखणा तरुण होता. पहिल्या भेटींतच अुर्मिलाबाअींकडे तो विशेष आकर्षिला गेला होता आणि त्याला खेळविण्याचा नवा डाव अुर्मिलाबाअी रचीत होत्या. त्यांची ती नेहमींचीच तऱ्हा होती. प्रकरण फार अंगाशीं येअूं न देतां माणसें कशीं झुलवायचीं अन् नको झालीं म्हणजे कशीं तोडून टाकायचीं, हें अुर्मिलाबाअींना चांगलेंच ठाअूक होतें आणि प्रत्येक डावांत यश आपल्याला मिळतें हें त्यांना पुरतेपणींच माहीत होतें.

जेवण संपल्यावर अितर माणसें हळूहळू अुठून गेलीं तरी माधव तसाच रेंगाळत राहिला. त्याची अस्वस्थ हालचाल निरखीत अुर्मिलाबाअी अैटींत मखमाली कोचावर रेलून पडल्या होत्या. अजूनहि डाव साधला नव्हता. अुगाच कांहीं तरी बोलावयाचें म्हणून माधव म्हणाला, "मला पाणी मागवतां का जरा?" अुर्मिलाबाअींनीं नोकराला हांक मारली; परंतु ती कुणालाच अैकूं गेली नाहीं. त्यांच्या हांका अैकून आंतमध्यें कुठें तरी वावरत असलेली श्यामला मात्र चटकन् दिवाणखान्याचा पडदा सारून दरवाजांत अुभी राहिली.

निळया रेशमी पडद्याच्या पार्श्वभूमीवर अुभी असलेली शुभ्र वस्त्रांतील तिची मूर्ति माधवला अेखाद्या शुचिर्भूत योगिनीप्रमाणें भासली. तिच्यांतील पावित्र्यानें त्याच्या पवित्र भावनांना आवाहन दिलें. त्याच्या डोळयांत अेकदम मंगल प्रसन्नता फुलून आली. त्याच्या नजरेंतला हा फरक अुर्मिलाबाअींच्या चाणाक्ष दृष्टीला तेव्हांच कळला. ती क्षणभरहि तेथें थांबणें धोक्याचें आहे हें त्यांना अुमगलें. त्यांनीं तिला हुकूम सोडला, "जा! कुणाला तरी पाणी आणायला सांग!"

परंतु तिलाहि तो हुकूम जणुं अैकूं आलाच नाहीं. आपल्या दर्शनानें अेका पुरुषाच्या चेहऱ्यावर अुत्सुकता अुमलली आहे ह्या नव्या जाणिवेनें ती भारून गेली. तिला न कळणारीं गूढ स्वप्नें अेकदम साकार होअून समोर आल्याचा भास तिला झाला. तिचे ओंठ किंचित् विलग झाले आणि त्यांवर तरळ हास्य ओघळून आलें.

त्या क्षणापासून अुर्मिलाबाअींच्या पराजयाला सुरुवात झाली. आपल्यावर खिळलेलें लक्ष असें अितक्या सहजासहजीं अुडाल्याचा हा त्यांचा पहिलाच अनुभव होता. श्यामला आंत निघून गेली तरी देखील ती परत येअील ह्या अपेक्षेनें माधव तिथेंच घुटमळत बसला. त्यामुळें अुर्मिलाबाअी अधिकच संतापल्या; परंतु हातचें सावज निसटूं लागलें म्हणजे अधिकच त्वेषानें शिकारी त्यामागें धांवत सुटतो त्याप्रमाणें माधवाला आपल्याच मुठींत पकडून ठेवण्यासाठीं त्या धडपडूं लागल्या.

त्यानंतर श्यामलेला बाहेर पाअूलहि न टाकण्याची त्यांनीं सक्त ताकीद दिली. तिला चिडविण्यासाठीं त्या माधवला वारंवार बोलवूं लागल्या. त्याच्या दृष्टीलाहि ती पडूं नये ह्याची त्या काळजी घेत; परंतु आजपर्यन्त प्रत्येक जण जसा त्यांना अंकित झाला होता तसा कांहीं माधव होअीना;. पण अुर्मिलाबाअी अीर्षेला पेटल्या होत्या. पराभवाची कल्पनाहि त्यांना सहन होण्यासारखी नव्हती. दुसऱ्याला वश करून घेण्यासाठीं तडफडण्याची ही त्यांची पहिलीच वेळ होती. ह्या यातना नव्या होत्या. ही तळमळ आजपर्यन्त त्यांच्या अनुभवास आली नव्हती.

अेके दिवशीं त्या कुठें तरी बाहेर गेल्या असतांना माधव अचानक त्यांच्या घरीं आला. दिवाणखान्यांत तो त्यांची वाट पहात बसला होता खरा; परंतु त्याच्या मनांत अपेक्षा दुसरीच होती आणि त्याच्या अपेक्षेप्रमाणें झालेंहि. हातांत फुलें घेअून तीं मेजावरच्या पात्रांत ठेवण्याच्या मिषानें श्यामला बाहेर आली. त्याला पाहून ती आंत जाण्याचें सोंग करूं लागली, तों त्यानें हांक मारली,

"का, आंतमध्यें चाललातशा ?"

"नको; अुर्मिलामावशीनं जर का मला अिथं पाहिलं तर ती मला ह्या घरातच ठेवणार नाहीं परत !" बावरलेल्या मुद्रेनें तिनें उत्तर दिलें.

" कां? अुर्मिलाबाअींचा अेवढा राग आहे तुमच्यावर?"

" नाहीं, माझ्यावर राग नाहीं; परंतु मी तुमच्याशीं बोललेलं तिला आवडणार नाहीं."

" पण असं कां?"

त्या प्रश्नानें श्यामलेचीं आजवर दाबून ठेवलेलीं सारीं दुःखें अेकदम अुसळून वर आलीं. स्फुंदत स्फुंदत तिनें माधवाला सारी हकीगत सांगितली. अखेरीस ती म्हणाली, " तुम्ही जा आता लवकर, मला अुर्मिलामावशीची भयंकर भीति वाटते. तिचा हुकूम मोडण्याचं सामर्थ्य माझ्यांत नाहीं!"

माधव गेला; परंतु अुर्मिलाबाअी नसतांना श्यामलेला भेटण्यासाठीं तो वारंवार येअूं लागला. कुणीं तरी चहाडखोर नोकरानें अुर्मिलाबाअींकडे चुगली केली. अुर्मिलाबाअींच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. त्या कडाडून ओरडल्या, " कुठंय ती श्यामी? आणा तिला बोलावून!"

श्यामलेला शोधण्यासाठीं जो तो धावपळ करूं लागला; परंतु सबंध बंगल्यांत तिचा कुठेंच पत्ता नव्हता.

रात्रीं आठ वाजतां ती हलक्या पावलांनीं घरांत शिरली. बाहेर झिमझिम पाअूस पडत होता. तिचें सर्वांग भिजून निथळत होतें. व्हरांड्यांत अंधारांतच पहारा करीत बसलेल्या अुर्मिलाबाअी खेकसल्या, " कुठं गेली होतीस?" न चिडतां, न भेदरतां श्यामला हंसत म्हणाली, " अय्या, मावशी! तूं होय? काय पण दचकलें मी अगदीं!" तिच्या प्रसन्नतेनें अधिकच खवळून अुर्मिलाबाअी म्हणाल्या, " टाळाटाळ करूं नकोस. विचारलेल्या प्रश्नाचं अुत्तर दे!"

मुद्रेवरचें हास्य ढळूं न देतां श्यामलेनें उत्तर दिलें, " मी माधवबरोबर दूर फिरायला गेलें होतें म्हणून मला अुशीर झाला मावशी."

" तुला त्याच्याबरोबर जाण्याचं काय कारण होतं? मीं तुला मागंच बजावलं होतं ना? मग माझा शब्द कां मोडलास?"

" पण मावशी, त्याची-माझी मैत्री आहे. आमचं दोघांचं प्रेम आहे अेकमेकांवर. आणि मावशी! आम्ही लवकरच लग्न करणार आहोंत!"

" कुणाच्या परवानगीनं तूं त्याच्याशीं ही अेवढी सलगी वाढवलीस?"

" प्रेम करायला कुणाची परवानगी घ्यावी लागत नाहीं ! " श्यामला मिस्कीलपणें हंसून म्हणाली. अुर्मिलाबाअींच्या मस्तकांत अेकदम आग पेटली. तिचा दंड धरून तरातरा तिला दिवाणखान्याच्या अुजेडांत ओढून आणीत त्या म्हणाल्या, " तूं अितकी कृतघ्न असशील असं मला वाटलं नव्हतं. माझ्या अन्नावर तूं वाढलीस आणि माझ्याशीं बेअिमानी करतेस ? थांब, तुझा जीव जाअीपर्यंत तुला चोपून काढतें ! "

आपला दंड हिसडून घेत अेखाद्या वाघिणीसारखी खवळून श्यामला ओरडली, " खबरदार माझ्या अंगाला हात लावशील तर ! कोण माणूस आहेस का राक्षसीण ? मी तुझ्याशीं बेअिमानी केली म्हणतेस ! पण मावशी, प्रेमाचा मोहच असा आहे कीं, त्यापुढें माणसाला सगळ्या कर्तव्यांचा विसर पडतो. हा अेकच नाद असा आहे कीं, त्यासाठीं स्वतःच्या नाशसुद्धां मनुष्य आनंदानं करून घेतो ; पण मावशी, तुला कुठून समजणार हें सारं ? प्रेमाचीं सुखदुःखं तुला कशीं माहीत असणार ? जाअूं दे मला. तूं मला भाकरी दिलीस ; पण माया मात्र लावली नाहींस कधीं ! तरी देखील तुझं घर सोडतांना वाअीट वाटतंय मला ; पण नाअिलाज आहे माझा ! " गच्चीवरून जाअून श्यामला निश्चल अुभी राहिली. टक लावून अुर्मिलाबाअी तिच्याकडे पहात होत्या. केवढा फरक पडला होता तिच्यांत ! अुत्कट प्रीतीच्या अनुभवानें तिच्या स्त्रीत्वाची पाकळी न् पाकळी अुमलून आली होती. तिच्या व्यक्तिमत्त्वाचा पूर्ण विकास झाला होता. फुलत असलेल्या मदनबाणाच्या कळीभोंवतीं जसा गंध दरवळत असतो तसें तिचें यौवन तिच्या भोंवतीं तरळत होतें.

अुर्मिलाबाअी अेकदम दचकल्या. तिचा नैसर्गिक विकास पाहून आपल्या कृत्रिम विलासाची त्यांना शरम वाटली ; तरी पण शेवटचा विषारी फूत्कार त्यांनीं केलाच ! " किती मूर्ख आहेस तूं ! तुला काय वाटतं ? तुझ्यावर तो प्रेम करतोय, होय ? अग, क्षणभर मौज करायला मिळाली तर कुणाला नको असते ? त्याला जिंकण्यासारखं अेरवी आहेच काय तुझ्यांत ? "

" मावशी, तुझ्यासारखं लावण्य माझ्यांत नाहीं, तुझ्यासारखी मी चतुरहि नाहीं आणि श्रीमन्तहि नाहीं हें मला माहीत आहे ; पण तुझ्या सौंदर्याला आणि अैश्वर्यालाहि म जुमानणारं अेक अस्त्र माझ्याजवळ आहे. तें म्हणजे तारुण्य ! माझं तारुण्य ! या यौवनाचं वरदान ज्याला लाभलं आहे त्याला

कशाचंहि भय नाहीं या जगांत! त्याच्या साहाय्यानं मी कुठलाहि लढा जिंकीन; पण जाऊं दे. मी जातें. यापुढं मी तुझ्याजवळ रहाणं आपणां दोघींनाहि श्रेयस्कर नाहीं!" बोलतां बोलतां तिनें पाठ वळविली आणि हळू-हळू पायऱ्या अुतरून ती निघूनहि गेली! बाहेर पावसाळ[illegible] चढला होता.

त्या क्षणापासून अुर्मिलाबाअींच्या ह्या नव्या यातनांना सुरुवात झाली होती. अेखाद्या वेड लागलेल्या माणसासारख्या भकास मुद्रा करून त्या आरामखुर्चीवर पडल्या होत्या. हें पराजयाचें दुःख आपल्या वांट्याला येअील असें त्यांना कधींहि वाटलें नव्हतें. त्यांनीं अनेक माणसें जिंकलीं होतीं. श्यामलेनें अेकच मनुष्य जिंकला होता; तरी पण तिचा विजय त्यांना किती तरी मोठा वाटला!

'नवयुग'
१९ ऑगस्ट १९५१



# विश्वास : : ७

संध्याकाळचे साडेसहा वाजले कीं 'माणिक-मॅन्शन' मध्यें राहणाऱ्या अिन्दुताअींकडे बाळासाहेब गोडबोल्यांची फेरी अगदीं ठरलेली असायची. 'माणिक-मॅन्शन' मध्यें ते शिरले आणि कराकरा वहाणा वाजवीत तिसऱ्या मजल्यावर अिन्दुताअींच्या बिऱ्हाडाकडे जाअूं लागले म्हणजे सगळे भाडेकरू फटाफटा दारें अुघडीत आणि बाळासाहेबांच्या आकृतीकडे कुतूहलानें पहात. बाळासाहेब अेकदां दिसेनासे झाले म्हणजे अेकमेकांकडे हंसून पहात आणि खांदे अुडवीत ते आपापसांत बडबडत, 'काय भानगड आहे दोघांची परमेश्वराला ठाअूक!'

आपल्यामागें कुजबुज सुरू होते ह्याची बाळासाहेबांना पूर्ण जाणीव होती; पण त्या कल्पनेनें त्यांना चीड येण्याअैवजीं, किंवा दुःख वाटण्याअैवजीं अुलट मौजच वाटे. मिस्किलपणें गालांतल्या गालांत हंसत ते धीमेपणानें अेकेक पायरी वरवर चढून जात. कांहीं कांहीं माणसेंच अशीं असतात कीं, त्यांना लोकांनीं आपल्याकडे बोटें दाखवून कुजबुजलेलें आवडतें. आपल्याविषयीं अफवा अुठलेल्या पाहून त्यांना गंमत वाटते. लोकांच्या चर्चेचा विषय होण्यांत त्यांना सुख वाटतें. बाळासाहेबहि ह्याच प्रवृत्तीचे होते. 'माणिक-मॅन्शन' मध्यें आपल्याला अेक वेगळेंच महत्त्व आहे हें त्यांना पुरेपूर माहीत होतें. म्हणूनच अिन्दुताअींच्या बिऱ्हाडाची पायरी चढतांना ते केवढे हुरळून जात!

दाराची कडी खडखडली म्हणजे अिन्दुताअींचा सात-आठ वर्षांचा मुलगा अविनाश दार अुघडी. बाळासाहेबांची मूर्ति दृष्टीला पडतांच त्याला कोण

आनंद होअी! 'आअी! बाळासाहेब आले, आअी, बाऽऽसाहेब आले!' अशी गोड किलबिल करीत तो स्वयंपाकघराकडे वर्दी द्यायला जाअी. तोंवर बाळासाहेब डोक्यावरची टोपी काढीत आणि मेजावरचें अेखादें पुस्तक नाहीं तर मासिक अुचलीत व आरामखुर्चीमध्यें अंग झोंकून देत. मग अविनाश जो धांवत येअी तो त्यांच्या मांडीवर चढून बसे आणि त्यांचा कोट ओढीत विचारी, "बाऽऽसाहेब आम्हांला खाअू आणलात? मीं तुम्हांला काल सांगितल्या होत्या तसल्या लाल गोळया आणल्यात? बाऽऽसाहेब, त्यांनीं जीभ कशी तांबडी तांबडी होते ना हो?"

'अरे हो, देतों, देतों!' असें म्हणत बाळासाहेब खिशांतून गोळयांची पुडी काढीत. त्यांच्या हातून ती हिसकावून घेत अविनाश तिच्यावरचा कागद फाडी. पहिली गोळी तो आपल्या तोंडांत टाकी आणि मग तिचा कुडुम कुडुम असा आवाज काढीत तो बाळासाहेबांना विचारी, "बाऽऽसाहेब तुम्ही घ्या ना अेक गोळी?" आणि त्यांच्या अुत्तराची वाट न पहातां तो ती गोळी त्यांच्या तोंडांत कोंबी. बाळासाहेब गोळी चोखूं लागले म्हणजे तो म्हणे, 'तुम्ही अेकदम खाअून टाकत नाहीं गोळी? बरं हं, मग आतां दुसरी गोळी मी तुमच्यासारखी चोखीन!'

बाळासाहेब त्याच्याशीं विशेष बोलत नसत; पण प्रेमळपणानें त्याच्या पाठीवरून हात फिरवीत त्याची सारी बडबड शान्तपणें अैकून घेत. दिवसांत घडलेल्या साऱ्या घटना त्यांना सांगितल्याशिवाय अवीला चैनच पडत नसे. बाळासाहेबांच्या कोटाच्या खिशाला अडकवलेलें पेन ओढून त्यानें आपल्या तळहातावर माणसाचा चेहरा रेखाटीत तो बडबडूं लागे, 'बाळासाहेब, आज कनी अशी गंमत झाली, आअी कपाट साफ करीत होती ना तेव्हां अेक मोठं झुरळ तिच्या पातळांत शिरलं. बाऽऽसाहेब, केवढ्या मोठ्या मिशा होत्या त्याला! आअी इतकी भित्री आहे! अुगीचच किंचाळत बसली! मग मीं तें झुरळ पकडलं आणि अस्सं बुटाखालीं चिरडलं. अन् बाऽऽसाहेब, आअी तर अितकी घाबरट आहे. हॅट बुवा! त्या मेलेल्या झुरळाला केरसुणी लावायला पण भिते ती! सगळया बायका अशाच घाबरट असतात ना? अन् बाऽऽसाहेब, मीं आअीचं गंगावन मला मिशा करायला कापलं, तर तिनं मला या अिथं चापटी मारली हो! ही बघा ह्या अिकडं मारली!'

'हुं!' 'अस्सं!' 'अरे वा!' बाळासाहेब नुसतेच अेकेक शब्दाचे अुद्गार काढीत त्याचें बोलणें अैकल्याचा देखावा करीत. त्याची बडबड फारच वाढूं लागली म्हणजे मग म्हणत, 'जा, आअीला सांग, म्हणावं बाळासाहेबांना अुशीर होतोय्!'

तेवढ्यांत कॉफीचा कप व पोह्यांची बशी घेअून अिन्दुताअी बाहेर येत. मग त्यांच्या आणि बाळासाहेबांच्या गप्पांना रंग चढे. आपल्याशीं बाळासाहेब अितकें थोडें बोलतात आणि मग आअीशीं कसे ते तासन्‌तास गप्पा करतात हें अवीला समजत नसे; पण तो आपले टपोरे नी वाटोळे डोळे आअीकडे लावून बाळासाहेबांच्या मांडीवरच बसून राही. मधून मधून बाळासाहेब आवेशानें बोलूं लागले म्हणजे तो त्यांच्या चेहऱ्याकडे कौतुकानें टक लावून पाही. त्यांच्या कपाळावरील ताठरलेली शीर दाबून पाहण्याचा त्याला फार मोह होअी; पण तो आपला गप्पच राही. हळूहळू त्याच्या पापण्या लवूं लागत आणि तो बाळासाहेबांच्या छातीवर डोकें टेकूनच झोंपीं जाअी.

जेव्हां आअी त्याला जेवायला गदगदा हालवून अुठवी त्या वेळीं त्याला अलगदपणें पलंगावर आणून झोंपवलेलें असे. जागा झाल्यावर तो डोळे चोळीत आजूबाजूला पाही आणि आअीला विचारी, 'आअी, बाऽऽसाहेब गेले?' अिन्दुताअी मानेनेंच 'होय' म्हणून सांगे. त्याचा घसा अेकदम दाटून येअी आणि पलंगावर हातपाय आपटीत गेंगाणा सूर काढीत तो अिन्दुताअींना म्हणे, 'कां जाअूं दिलंस तूं त्यांना? मला त्यांच्या मांडीवर बसून जेवायचंय्!'

त्याची समजूत घालतां घालतां अिन्दुताअींच्या नाकीं नअू येत. जेवतां जेवतां पोळीचा तुकडा हातांतच धरून अवी विचारी, "आअी, अनिलचे बाबा कसे ग त्याच्या घरीं राहतात आणि जेवतात? मग बाऽऽसाहेब कां आपल्यांत रहात नाहींत?"

डोळयांत दाटलेलें पाणी आवरीत अिन्दुताअी बळेंच हंसत, आणि त्याचे केस कुरवाळीत अुत्तर देत, 'अरे वेड्यां, बाळासाहेब तुझे बाबा नाहींत कांहीं! तुझे बाबा देवाच्या घरीं गेले आहेत!'

'मग बाऽऽसाहेब कुणाचे बाबा आहेत?' तो हट्टानें ओठ पुढें काढीत विचारी. त्या प्रश्नानें मात्र अिन्दुताअींच्या कपाळावर आंठ्या चढत.

'आहेत चार घोड्यांचे बाप! तुला कशाला त्याची पंचाअीत हवी गधड्या? मुकाटयानें जेव!' डाव्या मुठीनें डोळे चोळत अवी अुरलेली अख्खी पोळी तोंडांत कोंबी आणि पानावरून अुठे. मग अिन्दुताअींचें अंतःकरणहि भरून येअी. कसेबसे चार घास त्या पोटांत ढकलीत आणि स्वयंपाकघरांतला पसारा आवरूं लागत.

बाहेरच्या गॅलरींत कठडयावर हनुवटी टेकून अवी रस्त्यावरची थंडावत चाललेली रहदारी पहात अुभा राही. त्याला कांहीं तरी चुकल्यासारखें वाटे. त्या घरांत त्याचें मन रमेनासें होअी. बाळासाहेब, रोज गोळया आणणारे त्याचे लाडके बाळासाहेब, दार अुघडतांच त्याच्या पाठीवर भली मोठी थाप मारणारे अुंचच अुंच बाळासाहेब, गपागपा पोहे खातांना गमतीदार तोंडें करणारे वेडे बाळासाहेब, आपल्या साऱ्या जंमती आपण फक्त ज्यांनाच सांगूं शकतों ते आपले आवडते बाळासाहेब! ते ज्या घरांत नाहींत त्या घरांत कशाला रहायचें? हें जर त्यांचें घर नाहीं तर मग ते अिथें येतात तरी कशाला आणि आपल्याला न सांगतां जातात तरी कुठें? आपण त्यांची अितकी वाट पहातों आणि ते आपल्याबरोबर जेवायलासुद्धां थांबत नाहींत, आपल्याला ताटांतली पोळीसुद्धां भरवत नाहींत! वाईट आहेत जा बाळासाहेब! आतां अुद्यांपासून त्यांच्याशीं बोलायचें सुद्धां नाहीं. अवीचे डोळे चटकन् भरून येत. हिरमुसल्या तोंडानें तो आंतमध्यें जाअी आणि अुशींत डोकें खुपसून डोळे मिटून घेअी; पण दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं कडी वाजली कीं तो धांवत धांवत दार अुघडायला जाअी आणि बाळासाहेबांनीं त्याच्या पाठीवर थाप मारली म्हणजे आनंदानें त्याचें अंतःकरण गुदमरून येअी.

पण त्या दिवशीं मात्र अवी खरोखरीच रुसला होता. तीन दिवस झाले, पण बाळासाहेब आले नव्हते. जातेवेळीं त्यांनीं अवीला दोरीवरून सरकणारा रंगीत भोंवरा आणून देण्याचें वचन दिलें होतें. ते जिना अुतरून जाअीपर्यंत अवीनें ओरडून ओरडून त्यांना सांगितलें होतें, 'बाऽऽसाहेब, नक्की आणाल ना? बाऽऽसाहेब, विसरूं नका हं!' बाळासाहेबहि मागें वळून पहात 'हो, हो,' करीत गेले होते; पण अजूनहि ते आले नव्हते. रोज संध्याकाळीं त्यांची वाट पहातां पहातां अवी झोंपीं जाअी, पण बाळासाहेब आले नव्हते!

शेवटीं बाळासाहेब आले; परंतु अवीनें दार अुघडल्यावर त्यांनीं त्याच्या पाठीवर नेहमींसारखी थाप मारली नाहीं. त्याला बाजूला लोटून ते आराम-खुर्चीवर कपाळाला हात लावून बसले.

'बाऽऽसाहेब तुम्हांला पडसं झालंय होय?' भोंवऱ्याची मागणी अजी-बात विसरून गेलेल्या अवीनें त्यांच्या खांद्याला बिलगत विचारलें. बाळा-साहेबांनीं त्याला कांहींसुद्धां अुत्तर दिलें नाहीं. अुलट त्याला स्वयंपाकघराच्या दिशेनें ढकलीत ते म्हणाले, 'जा, आअीला हांक मार अन् तिला म्हणावं कॉफी वगैरे कांहींअेक ठेवूं नकोस!' मान डोलावीत अवी स्वयंपाकघराकडे पळाला. बाळासाहेबांचा निरोप त्यानें अिन्दुताअींना सांगितला; पण त्या देखील कानांवर हात ठेवून घुमेपणानें बसून राहिल्या.

किती तरी वेळ असाच गेला; पण अिन्दुताअी पाटावरून अुठल्या नाहींत कीं बाळासाहेबहि खुर्चीवरून हालले नाहींत. स्वयंपाकघराचें दार पुढें-मागें लोटत त्याचा कुर्र् कुअीऽऽ असा आवाज अैकत अवीहि आपल्याच नादांत खेळत राहिला. मध्येंच त्याच्या डोक्यांत काय विचार आला कोण जाणे! खुदकन् हंसून तो बाळासाहेबांकडे धांवत गेला. बाळाहेबांचें मनगट हालवीत तो म्हणाला, 'बाऽऽसाहेब, तुम्हीं आअीशीं भांडलांत ना? मला कळलं, तुम्ही त्या दिवशीं मी झोंपल्यावर आलांत नी तिच्याशीं गडी फू केलीत ना? म्हणूनच तुम्ही काल आलां नाहींत! मी पण शेजारच्या लिलूशीं गडी फू केली; तेव्हां तिच्याकडे गेलोंच नाहीं खेळायला!'

त्याच्या त्या अवखळ बोलण्यानेंहि बाळासाहेबांच्या कपाळावरच्या आठ्या अुतरल्या नाहींत. अुलट त्यांनीं आपलें कपाळ घट्टच दाबून धरलें. अवीच्या कोंवळ्या हातांच्या पकडींतून आपलें राठ मनगट ओढून घेत ते अिन्दुताअीला अुद्देशून मोठ्यानें म्हणाले, 'अेकूण तुला आतां माझी गरज नाहीं तर! नसेल गरज तर हा मी निघालों. फिरून तोंड पहाणार नाहीं तुझं!'

अंगाखालचा पाट जोरानें बाजूला हिसडून अिन्दुताअी बाहेर आल्या आणि बोलल्या, 'गरजेची भाषा तुमच्याच तोंडून निघते आहे. मी कोण 'हवं नको' करणार? बोलून-चालून दोन घटकांची किंमत मला तुमच्या आयुष्यांत! मी कोण म्हणून तुम्हांला जा म्हणणार?'

माघारीं वळून बाळासाहेब खेंकसले, 'काय फिरून फिरून तोच तोच वाद घालतेस? अेकदां सांगितलं ना, कीं माझा नाअिलाज आहे, म्हणून तुझ्याजवळ मला रहातां येत नाहीं. माझ्यामागं चार जाणत्या पोरांचा संसार आहे, माझा अेवढा मोठा जबाबदारीचा कामधंदा आहे. अब्रूची चाड तुला नसली तरी मला आहे!'

'अहाहा! दिवे ओवाळा तुमच्या अब्रूवरून! जसं कांहीं चार लोक आज तुमच्या-माझ्याबद्दल बोलतच नसतील!'

'असतील, लाख बोलत असतील! पण धडधडीत बोटं दाखवून तर कांहीं सांगतां येत नाहीं ना त्यांना?'

'अस्सं! तुमची अब्रूची कल्पना अितकी नाजूक आहे तर! मग जा, जन्मभर तिलाच जपत बसा आणि जगाकडून शाबासकी मिळवा!' पाठ फिरवून अिंदुताअी स्वयंपाकघरांत गेली आणि पाटावर डोकें आपटून मोठ्यानें स्फुंदूं लागली.

बाळासाहेब क्षणभर घुटमळले. मग हातांतलें मासिक भिरकावून देत ते दाराकडे वळले. अितका वेळ भेदरून दाराआड अुभा असलेला अवी बाळासाहेबांच्या पाठीं धांवत गेला. बाळासाहेबांचा कोट ओढून तो म्हणाला, 'बाऽऽसाहेब रागावलांत तुम्ही? जाअूं नका ना बाऽऽसाहेब!' 'चल हो बाजूला!' त्याला मागच्या मागेंच ढकलून देत बाळासाहेब धडाधडा जिना अुतरून गेले!

अवीचा तोल जाअून तो दारावर आदळला आणि त्याच्या कपाळाला खोक पडून रक्ताची धार ओघळली. 'आअी ग!' अशी त्याची किंचाळी अैकून अिंदुताअी धांवत आल्या; पण बाळासाहेबांनीं अेकदांसुद्धां मागें वळून पाहिलें नाहीं. अिंदुताअींनीं त्याची जखम धुअून बांधली आणि त्याला पलंगावर आणून झोंपवलें, तरी तो घशांतल्या घशांत हुंदके कोंडून स्फुंदत होता. त्याच्या चिमुकल्या अंतःकरणाला दुःखाचा अेवढा मोठा भार पेलवतहि नव्हता. घुसळून घुसळून तें दुःख त्याच्या आंसवांवाटें बाहेर पडत होतें. कपाळावरच्या जखमेची त्याला आठवणहि नव्हती; पण आपण देअूं केलेलें प्रेम बाळासाहेबांनीं निर्दयपणें फुलाची नाजूक पाकळी कुसकरावी तसें खसदिशीं चुरडून टाकलें होतें ह्याचें दुःख त्याला अधिक छळीत होतें. आपलें कुठें चुकलें होतें कीं, त्यासाठीं बाळासाहेबांनीं आपल्याकडे ढुंकूनहि न बघतां आपल्याला असें मागें लोटून दिलें होतें, हेंच त्याला समजत

नव्हतें. आओीसुद्धां कधीं कधीं मारते, पण आपण तिची कांहीं तरी खोडी काढतों म्हणूनच ! मग आपल्या प्रेमाला बाळासाहेबांनीं अितकें दुष्ट अुत्तर कां दिलें ? त्याचें चिमुकलें डोकें विचार करून थकलें आणि रडून रडून जडावलेले डोळे आपोआपच मिटूं लागले.

जांभया देत जेव्हां तो जागा झाला तेव्हां त्याच्या डोक्यांत प्रथम बाळा-साहेबांचा विचार आला ; पण त्या वेळीं बाळासाहेबांच्या चांगुलपणावरचा त्याचा विश्वास पार अुडाला होता. तिरस्काराचा पहिला चटका बसून त्याचें अंतःकरण त्या वेळीं करपून गेलें होतें. पाटीवर लिहिलेलीं अक्षरें पुसून काढावींत तसा त्यानें बाळासाहेबांचा विचार डोक्यांतून पार काढून टाकला. स्वयंपाकघरांतून रवा भाजल्याचा गोड वास आला. त्या सरशीं टुणकन् अुडी मारून तो अिंदुताअींना हांक मारीत आंत गेला.

त्यानंतर किती तरी दिवस झाले. बाळासाहेबांनीं चुकूनसुद्धां अिंदुताअींच्या घरीं पाअूल टाकलें नाहीं. अेके दिवशीं संध्याकाळीं अिंदुताअी अवीला स्वेटर विणीत बसली होती आणि तिच्याच मांडीवर डोकें ठेवून हवेंत तंगड्या अुडवीत अवी अुगाच खिदळत होता.

अितक्यांत दारावरची कडी वाजली. शेजारची लिलू आली असेल ह्या कल्पनेनें धांवत जाअून अवीनें दार अुघडलें, तों दारांत बाळासाहेब अुभे होते. नेहमींसारखे हंसतमुखानें, आत्मविश्वासानें ते आले नव्हते. अेखाद्या अपराध्यासारखी मान खालीं घालून दारावर हात देअून ते अुभे होते. अवी चटकन् मागें सरला आणि त्यांच्या चेहऱ्यावर डोळे रोखून अुभा राहिला. त्याच्या भाबड्या तपकिरी डोळ्यांमध्यें आग पेटली. लाल पिवळ्या ज्वालांकडे बघणाऱ्या माणसाच्या डोळ्यांत भेसूर प्रकाश पडावा तसे त्याचे डोळे दिसत होते. चांचरत चांचरत बाळासाहेब त्याच्या पाठीवर हात ठेवून म्हणाले, ' काय अवी, आठवण आहे का आमची ? ' त्यांचा हात हिसडून टाकून अवी आपल्या आअीला जाअून बिलगला. बाळासाहेब अेकदम चमकले. गुलाबाच्या कोवळ्या कळीला बोट लावावें तोंच तिच्या आड दडलेल्या विषारी किड्यानें दंश करावा तसें त्यांना वाटलें. त्या अपेक्षाभंगानें ते केवढ्यांदां दचकले !

थंड अन् निर्विकार नजरेनें अिन्दुताअी हा सारा खेळ पहात जागच्या जागींच बसून होत्या. त्यांची पापणी जरा सुद्धां चळली नाहीं. त्यांनीं

बाळासाहेबांना या म्हटलें नाहीं कीं बसा म्हटलें नाहीं. शेवटचें आमिष म्हणून बाळासाहेबांनीं खिशांतून लाल भडक वेष्टण असलेली चॉकोलेटची लांबच लांब वडी काढली आणि अवीला मानेनें जवळ बोलावीत ते म्हणाले, ‘ अिकडे ये अवी ! आम्ही बघ तुझ्यासाठीं काय गंमत आणली आहे. ’ पण अवीनें हूं कीं चूं केलें नाहीं. निश्चयानें ओठ घट्ट मिटून तो आअीला बिलगूनच बसला होता.

कसा तरी आरामखुर्चीचा आधार घेत बाळासाहेब म्हणाले, ‘ बरं नव्हतं गेले पंधरा दिवस. बारीक ताप येत होता. फार त्रास झाला. ’

‘ मग, तुमची धर्माची बायको होती ना सारे कष्ट अुपसायला ! ’ अिंदुताअी कडवटपणें अुद्गारल्या. बाळासाहेबांनीं त्यांच्याकडे अेक जळजळीत कटाक्ष फेंकला आणि ते ताडकन् अुठले. हातांतलें चॉकोलेट त्यांनीं तसेंच खुर्चीवर टाकलें आणि अुंबरठा ओलांडून ते जिन्याकडे वळले. अवीच्या डोळ्यांत त्याच्या कोंवळ्या चेहऱ्याला न शोभणारा चमत्कारिक आनंद लकाकला. आअीची कुशी सोडून तो चटकन् अुठला आणि बाळासाहेबांनीं टाकलेलें चॉकोलेट अुचलून घेअून तो धांवत बाहेर आला. जड पावलांनीं बाळासाहेब जिना अुतरीत होते. नेम धरून तें चॉकोलेट त्यानें बाळासाहेबांच्या अंगावर फेंकलें; पण नेम हुकला आणि तें त्यांच्या पायांवर येअून पडलें. दचकून त्यांनीं वर पाहिलें तों ओठावर दांत दाबून आविनाश त्यांच्याकडे टवकारून पहात होता. त्याच्या नजरेंतली ती निराळीच चमक पाहून बाळासाहेब क्षणभर दिपले. आजपर्यन्त त्यांच्यावर अनेक वेळां रोखली गेलेली भाबड्या विश्वासाची आणि निर्व्याज प्रेमाची ती नजर नव्हती. दुष्ट व्यवहाराची प्रथमच जाणीव झाल्यामुळें भेदरून गेलेली आणि अधिकच प्रखर भासणारी कावेबाज नजर होती ती ! जिव्हाळ्यानें देअूं केलेलें प्रेम अव्हेरल्यामुळें केवढा तरी फरक पडला होता त्या नजरेंत ! खेळकर विश्वासाचा तो पहिला गोडवा कदाचित् त्या नजरेंत पुन्हां कधींहि चमकणार नव्हता !

‘ नवयुग ’
दिवाळी अंक १९५१

★ ★ ★

# वर्षाराणी : : ८

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे ही! ज्या वेळीं मनांत आली ती गोष्ट तावडतोब करून टाकण्याचा स्वभाव होता माणसाचा; ज्या वेळीं फक्त तो स्वतःच्याच विचार करीत असे; भूक लागली कीं त्याला खाण्याशिवाय दुसरी कुठलीहि गोष्ट सुचत नसे; हातांत तीरकमठा घेऊन भुकेल्या पोटींच तो रानांत शिकार शोधीत वणवण भटके; मनांत आलेल्या गोष्टीचा अतिरिक्त नाद घेऊन तो तिच्याच पाठीं धांवे आणि ती मिळेपर्यंत त्याचें समाधान होत नसे; ती मिळविण्यासाठीं तो प्रसंगीं प्राणांवर पाणी सोडायलाहि तयार होई; त्या वेळची गोष्ट आहे ही.

भलें थोरलें दाट जंगल होतें तें. त्याच्या अलीकडे आकाशाला टेकलेले अुंच अुंच पर्वत होते. पलीकडे लांबच लांब पसरलेलीं ओसाड माळरानें होतीं. पर्वतावर अुगम पावलेली नदी तें भयाण जंगल ओलांडून थेट माळरानांत घुसली होती. मग तिचा ओघ अुजवीकडे वळून दूर दूर कुठें तरी लांबवर गेला होता. जंगलामध्यें नदीच्या कांठीं अेक जागा अतिशय रमणीय होती. तिथें झाडी थोडीशी विरळ होती आणि सूर्यप्रकाशाला अवकाश होता. त्या ठिकाणीं जलदेवतेची अुपासना करणाऱ्या माणसांच्या अनेक टोळ्या रहात असत. पहिला पाऊस आला म्हणजे वेड लागल्याप्रमाणें ते नाचत, गात, हंसत. पहिल्या पावसाचे टपोरे थेंब अंगावर सांडूं लागले, म्हणजे त्यांना विलक्षण अुन्माद चढे. त्या पहिल्या पावसावर त्यांनीं किती तरी गाणीं रचलीं होतीं. सारें जंगल निनादून जाअील अितका अुंच स्वर काढून तीं गाणीं घुमवीत. ते सारा पावसाळा घालवीत. अेकत्र जमून गाणीं

गातांना सर्वांत ज्या स्त्रीचा आवाज अुंच जाअील ती स्त्री त्यांची राणी म्हणून निवडली जाअी. ती मरेपर्यंत राणीपदाचा हक्क तिच्याकडेच राही. तिला ते वर्षाराणी म्हणून संबोधीत.

अेका वर्षी त्यांची वर्षाराणी शिकारींत मारली गेली आणि मग त्यांनीं नवी वर्षाराणी निवडली. वीस-अेकवीस वर्षांची ती सुंदर वर्षाराणी सर्वांना अत्यंत आवडली. तिच्या बापानें तिला मोठ्या मिजासीनें आणि लाडानें वाढविली होती. आपल्या खर्ज स्वरामध्यें तिचा स्वर मिसळून घेअून त्यानें तिला अुंच स्वरांत गायला शिकविलें होतें. अेखाद्या मुलासारखी त्यानें तिला वाढविली होती; तरी तिचा कोमलपणा मात्र कायम राहिला होता. आपल्या दाट पिंगट केसांचा फुलेरा पाठीवर टाकून अैटीनें मान अुडवीत ती जाअूं लागली म्हणजे पावसांत आनंदानें नाचणारे मोर देखील शरमून जाअून आपला पिसारा मिटवून घेत. तिचे डोळे तर असे तिखट होते कीं, जंगलांतलें हिंस्र श्वापद देखील निमूटपणें मान खालीं घालून बाजूनें जाअी; पण तिच्याकडे बघण्याचा कांहीं त्याला धीर होअूं नये. तिची नेमबाजी तर टोळींतल्या कुठल्याहि पुरुषाला मागें सारील अितकी अचूक होती. आचरणानें ती अतिशय पवित्र आणि कडक होती. राणी व्हावयाला ती सर्वस्वीं लायक होती.

पावसाळा संपत आला कीं जंगलापलीकडच्या माळरानांत हिरवेंगार अुंच अुंच गवत फोफावून वाढे. मग जंगलांतल्या हरणांचे कळप चरावयास त्या माळरानांत जात. त्या गवतावर पोसून गुबगुबीत झालेल्या हरणाचें मॉंस जलदेवतेच्या अुपासकांना अत्यन्त आवडे. पावसाळा सरला कीं माळरानांतल्या शिकारीचा अुत्सव ते सुरू करीत. हातांत तीरकमठा घेअून अूर फुटेपर्यंन्त त्या माळरानांत ते हरणामागें पळत. पहिल्या शिकारीचें मांस ते यज्ञ करून अग्नीला अर्पण करीत आणि पुढच्या वर्षी लवकर पावसाळा यावा म्हणून प्रार्थना करीत.

त्या वर्षी कुठून कोण जाणे, अचानकपणें सोनेरी हरणांचे प्रचंड कळप माळरानांत चरावयास आले. चालीला मोठीं चपळ होतीं तीं हरणें! त्यांचा वेग पहातांना नजरच फिरे. सूर्य जरा वर आला म्हणजे नदीतीरानें तीं माळरानाकडे येत. पावसाचें पाणी पिअून हिरव्या धुंद झालेल्या कुरणांवर

त्यांचे कळप पळूं लागले म्हणजे मोठें लोभसवाणें दृश्य दिसे. आकाशाच्या निळ्याभोर मलमलींतून गळून पडलेलें पिवळेंझार अून त्यांच्या अंगांवर पडलें म्हणजे त्यांच्या अंगावरली सोनेरी दाट लव चमचम करूं लागे. त्यांच्यावर नेमका तीर मारणें मोठें मुष्किलीचें काम होतें.

जलदेवतेच्या अुपासकांनीं किती पाठलाग केला; पण व्यर्थ ! त्या सोनेरी हरणांतला अेक देखील हरीण त्यांच्या आटोक्यांत आला नाहीं. अेके दिवशीं वर्षाराणीनें सोनेरी हरिण मारून आणण्याचा निश्चय केला. मंत्र टाकून तिनें बाण परजले. निश्चयानें ओठ आवळून ती माळरानाकडे निवडक शिकारी पुरुष घेअून निघाली. संध्याकाळ होअीपर्यंत त्यांनीं सोनेरी हरणांचा पिच्छा सोडला नाहीं; परंतु सगळे बाण वायां गेले. त्यांतल्या त्यांत अेका अुंच पिळदार शिंगें असलेल्या गोंडस हरणामागें वर्षाराणी किती तरी धांवली; पण तिची धडपड फुकट गेली. चिडून जाअून ती अीर्षेनें त्याच्याच मागें धांवत सुटली. कुरणामागें कुरणें ओलांडलीं. अखेर नदीचा ओघ जिथें अुजवीकडे वळला होता तिकडे ती आली. झऱ्यावरून टुणटुण उड्या मारीत हरिण धांवत होतें आणि त्यावर आपली पेटलेली नजर रोखून पायांखालच्या जमिनीकडे क्षणभरहि न बघतां वर्षाराणी आणि तिचे प्रजाजन धांवत होते.

धांवतां धांवतां आजवर त्यांनीं कधींहि न पाहिलेलें अेक नवेंच जंगल लागलें. दमलेलें, थकलेलें, गरीब बिचारें हरिण झाडीमध्यें वेडेवांकडें पळूं लागलें. वर्षाराणीनें धनुष्याची दोरी खेचून अचूक नेम धरला. सूं सूं करीत तिचा बाण निघाला. हरणाच्या मांसल मांडींत तो घुसणार अितक्यांत अचानकपणें झाडींतून अेक लखलखीत टोंकाचा बाण घुंकारीत आला आणि वर्षाराणीनें सोडलेल्या बाणाच्या बरोबर मध्यावर जाअून आदळला. तिच्या बाणाचे दोन तुकडे होअून ते दोन दिशांना अुधळले गेले. बाण ज्या दिशेनें आला तिकडे त्यांनीं नजर वळविली. तेवढ्यांत हरिण निसटूनहि गेलें !

‘अचूक नेम ! अचूक नेम !’ आश्चर्यानें आणि कौतुकानें डोळे विस्फारून वर्षाराणी अुद्गारली. ती झाडीच्या रोखानें पाअूल अुचलणार तोंच तिच्या बरोबर आलेल्या पुरुषांनीं तिला मागें खेचली. ‘राणी, तिथें जाण्यांत धोका आहे. आपल्याला अपशकुन करणारा फक्त आपला शत्रुच असूं शकतो.’

अुत्कंठा दाबून वर्षाराणीनें पाठ वळवली आणि ती आपल्या जंगलाकडे परत फिरली.

ती सारी रात्र वर्षाराणीनें तळमळतच घालविली. 'आपल्यावरहि मात करणारी ही कोण व्यक्ति असेल, ह्या कुतूहलानें तिला तिळमात्र झोंप लागली नाहीं. दुसऱ्या दिवशीं तिनें टोळींतल्या सर्वांत म्हाताऱ्या स्त्रीला बोलावून आणलें. सगळे जण तिला आजी म्हणत असत. कितीतरी पिढ्या तिनें जगल्या-मेलेल्या पाहिल्या होत्या. तिचें वय कुणालाच सांगतां येत नसे.

वर्षाराणी तिला म्हणाली, 'आजी, तुला आमच्या सर्वांपेक्षां जास्त माहिती आहे म्हणून विचारतें, 'पलीकडच्या त्या अनोळखी जंगलांत कोण रहातं?' आपलें सफेत डोकें खाजवीत आजीनें बराच वेळ विचार केला व कांपऱ्या आवाजांत ती म्हणाली, 'खूप वर्षे झालीं त्या गोष्टीला. आपल्या टोळींत त्या वेळीं मोठं भांडण झालं. टोळींत दोन गट पडले होते. वर्षाराणीशीं लग्न करण्याबाबत दोघांमध्यें मारामारी सुरू झाली. पण बेटा, तुला माहीतच आहे कीं, बळाचा विजय होतो. दोन गटांपैकीं अेकाचा पराजय झाला! जय झालेल्या लोकांनीं त्यांना लुटण्यास आरंभ केला. जीव वांचाविण्यासाठीं पराभव पावलेले लोक वाट फुटेल तिकडे पळत सुटले. मला वाटतं तेच त्या जंगलांत राहिले असतील. कित्येक वर्षांत त्यांचा ठावठिकाणाहि नाहीं!'

'हुं!' वर्षाराणीनें सुस्कारा सोडला. रात्र पडली तशी तिनें मंत्र टाकून बाण परजले. आपल्या देवतेचें स्मरण केलें आणि कुणालाहि न सांगतां, न कळवतां ती गुपचुप माळरानाच्या दिशेनें निघाली. आपण काय करतों हें जर टोळीला कळलें तर आपल्याला देखील शिक्षा देअून ठार मारण्याचा हक्क टोळीकडे आहे हें तिला माहीत होतें, पण तिचें धाडसहि तसेंच अद्‌भुत होतें.

न थकतां, न भितां ती त्या जंगलाच्या सरहद्दीवर येअून पोंचली. तीरकमठा सरसावून ती जंगलाच्या दाट झाडींत घुसली. दूरवर कुठून तरी गाण्याचे सूर अैकूं येत होते. त्या रोखानें ती धीमेपणानें निघाली. गाण्याचे सूर अगदीं जवळ आले तशी ती थबकली व आसपास पाहूं लागली.

अेका झाडाखालीं थोडीशी जागा साफसूफ करून कुणी तरी पुरुष शेकोटी पेटवून अेकटाच पाठमोरा बसला होता. कुठले तरी चमत्कारिक सूर काढून

तो गात होता आणि गातां गातां तो हातांतील बाणांचीं टोंकें ज्वालांवर धरून तापवीत होता. बाण तापल्यानंतर निरखून पहाण्यासाठीं जेव्हां त्यानें वर अुचलले त्या वेळीं त्यांचीं टोंकें लखकन् झळकलीं. " ह्याच बाणानं काल माझा बाण मोडला. ह्याच माणसानं काल माझ्यावर मात केली!" वर्षाराणीच्या ध्यानांत सर्व कांहीं आलें. आपला बाण रोखून ती मोठ्यानें म्हणाली, " बघूं हा बाण अडवतां येतो का तुला?" आणि त्याच्या मानेवर नेम धरून तिनें आपला बाण सोडला. तिचे शब्द कानीं येतात न येतात तोंच चपळाअीनें वळून त्या मनुष्यानें हातांतला बाण वर फेंकला. वर्षाराणीचा बाण बरोबर त्याच्या बाणाच्या मध्यभागीं घुसला आणि अेकमेकांत गुंतून दोनहि बाण अुडून बाजूला पडले.

मग तो पुरुष वर्षाराणीवर नजर रोखून तिच्याजवळ चालत आला आणि म्हणाला, " माझी खात्री होती कीं, तूं आज येशील. केवळ तुझ्याकडे पाहूनच मी काल तुझ्या लोकांना जिवंत परत जाअूं दिलं. तुमच्यावर सूड अुगविण्यासाठीं आम्ही परत आलों आहोंत. आमच्यापुढेंच तीं हरणं पळवीत आणलीं आहेत आम्हीं. केवळ तूं होतीस म्हणूनच तुम्ही काल वांचलांत. तुझ्या नजरेला भुलून मीं तुझ्यावर गय केली; पण तूं जातांना मीं तुझ्यावर मंत्र फेंकला. मला माहीत होतं, त्या मंत्रानं भारून जाअून तूं परत माझ्याच पायांशीं येणार. पहिल्यांदां मी तुला कैद करतों!" असें म्हणून त्यानें तिचा हात घट्ट पकडला.

वर्षाराणी मंत्रमुग्ध झाल्याप्रमाणें जागींच खिळली होती. अेवढा दिमाख आजवर तिनें पाहिला नव्हता. तिच्यासमोर अुभा असलेला पुरुष तरुण आणि शक्तिमान् होता. त्याचे गुंजेसारखे तांबडेलाल बारीक डोळे आनंदानें चमकत होते. ' कोण तूं?' त्याच्या दंडावर बांधलेला पिसांचा सुंदर झुपका अुपसून काढीत तिनें विचारलें. " मी आमच्या टोळीचा संरक्षक आहें. माझ्याअितकं सामर्थ्य कुणांतहि नाहीं!" त्यानें ताठरपणें अुत्तर दिलें. " तुमची टोळी? कोणती तुमची टोळी?" तिनें परत विचारलें. ' आम्ही वायुराजाचे अुपासक आहोंत.' तो पिसांचा झुपका तिच्या केसांत खोवीत तो म्हणाला, " तुमच्यापासून फुटून आम्ही अनेक वर्षांपूर्वी या जंगलापलीकडे गेलों. जलदेवता आमच्यावर प्रसन्न होत नाहीं म्हणून आम्हीं सृष्टींतील

संहारक शक्तींची अुपासना करण्यास आरंभ केला. वारा ज्या वेळीं वादळ घेअून येतो, त्या वेळींच तो आपलं मंगल घेअून येतो. त्यानंतरच पाअूस पडतो. झंझावात आला म्हणजे आम्ही खूप मोठा अुत्सव सुरू करतों. अितकीं वर्षे वायुराजाची अुपासना करून आम्हीं खूप सामर्थ्य आणि संपत्ति जमविली. आतां आम्ही तुमच्या टोळीचा पुरता नाश केल्याशिवाय राहणार नाहीं खास! आमच्या नायकाची आज्ञाच आहे आम्हांला तशी!" 'कोण आहे तुमचा नायक?' वर्षाराणीनें विचारलें. "सर्वांत म्हातारा माणूस आमचा नायक असतो. तुमच्यासारखे आम्ही बाअीला मुख्य करीत नाहीं!" तो तिला हिणवीत म्हणाला. त्याबरोबर वर्षाराणी खदखदां हंसली. चकित होअून त्यानें विचारलें, 'हंसतेस कां?' 'तुम्हांला माहीत नाहीं वाटतं मी कोण आहे तें? मीच आमच्या टोळीची वर्षाराणी आहें.'

"कोण तूं? तूं?" दोन पावलें मागें सरून त्यानें विचारलें. त्याचा चेहरा अेकदम पांढरा फटफटीत पडला. दोन्ही हातांनीं कपाळ दाबून तो खालींच बसला. वर्षाराणीला कांहींच अुमज पडेना. त्याचे खांदे गदगदां हालवीत ती त्याला खोदखोदून विचारूं लागली, "कुमार, कुमार, काय झालं तुला?"

सद्गदित स्वरानें तो बोलूं लागला, "अरेरे! केवढी दुर्दैवाची गोष्ट! वर्षाराणीला पकडून आणण्याचा मी पण करून बसलों आहें. आमच्या नायकानं तिच्याशीं जबरीनं विवाह लावण्याचा निश्चय केला आहे. अनेक वर्षांपूर्वी आमच्या टोळीचा नायक वर्षाराणी गमावून पळून आला. त्याचा सूड म्हणून आम्ही तिला पळवून आणणार आहोंत; पण हें आतां कसं शक्य आहे? कारण...कारण तूं मलाच हवी आहेस. माझा विश्वास आहे कीं, निसर्गानं तुला माझ्यासाठींच जन्माला घातलं आहे. तुला मीं काल पहिल्यांदां पाहिलं तेव्हांच माझी खात्री पटली कीं, आपणां दोघांचाहि जन्म अेकमेकां-साठीं आहे; पण नाहीं...तें कसं शक्य आहे?"

किती तरी वेळ तीं दोघेंहि तशाच दिङ्मूढ अवस्थेंत बसलीं होतीं. अखेर कुमार तिला म्हणाला, 'जा, तूं आतां अिथून निघून जा. मीहि आमच्या लोकांना युक्तिप्रयुक्तीनें परत फिरवीन; पण जोंवर तुझी माझी टोळी अेकमेकांविरुद्ध आहे तोंवर मलाहि टोळीचे नियम पाळले पाहिजेत.'

'पण कुमार, आपण दोघेहि आपल्या टोळया सोडून दूर जाऊं! निसर्गानं आपल्या अंतःकरणाला दिलेली प्रेरणा टोळीच्या नियमांपेक्षांहि मोठी नाहीं का?' त्याचा हात पकडून अुत्सुकतेनें ती म्हणाली, 'नाहीं, नाहीं, त्रिवार नाहीं!' तिचा हात झटकून त्यानें अुत्तर दिलें व तिच्याकडे ढुंकूनहि न पहातां तो परत फिरला. जड अंतःकरणानें वर्षाराणी आपल्या जंगलाकडे परत गेली. नुकतीच कुठें पहांट फटफटूं लागली होती.

त्या दिवसापासून वर्षाराणीची तब्येत खालावूं लागली. दिवसेंदिवस ती खंगत चालली. हिंवाळा संपला. फुलांचा सुगंध घेअून वसंतहि आला; पण ती रोडावतच चालली. वसंतहि निघून गेला. पावसाची वाट पहात जल-देवतेचे अुपासक अुत्सवाची तयारी करूं लागले; पण पावसाचें चिन्ह कांहीं दिसेना. वर्षाराणी आजारी आहे म्हणूनच पाअूस पडत नाहीं असें त्यांना वाटलें. त्यांनीं तिच्यावर नाना तऱ्हेचे अुपचार केले, पण कांहीं यश येअीना. वर्षाराणी अितकी सुकून गेली होती तरी तिच्या डोळयांतलें तेज मात्र अजून टवटवीत होतें. कशाची तरी अपेक्षा करीत असल्याप्रमाणें तिचे डोळे नेहमीं आतुर दिसत.

अखेर अेके दिवशीं आजीला बोलावून ती म्हणाली, 'आजी, मला आतां अिथं नाहीं रहायचं! मला आतां वर्षाराणी म्हणून पण नाहीं रहायचं. मी कुठं तरी दूर दूर जाणार आहें! जिथं माझ्या आयुष्यांतला हरवलेला आनंद मला परत सांपडेल.' आपल्या सुरकुतलेल्या हातांनीं वर्षाराणीचें मुख कुर-वाळीत आजी म्हणाली, 'बेटा, हें कसं बरं शक्य आहे? कुठल्याहि वर्षा-राणीला असं करतां येत नाहीं. तुला वर्षाराणीचं पद सोडावयाचं असेल तर त्याला अेकच अुपाय आहे.' 'तो कोणता?' तिनें विचारलें. थोडा वेळ थांबून आजीनें अुत्तर दिलें, 'तुला मरावं लागेल! मेल्याशिवाय राणीपद सुटत नाहीं!' वर्षाराणी कांहींच न बोलतां खिन्नपणानें हंसली.

दुसऱ्या दिवशीं वर्षाराणी टोळींतून बेपत्ता झालेली आढळली. तिचा शोध लावण्यासाठीं जलदेवतेचे अुपासक दाही दिशांना निघाले.

अिकडे वर्षाराणी रात्रीच्या रात्रीं माळरानें ओलांडून त्या अनोळखी जंगलांत शिरली. तिच्या पायांत विलक्षण बळ आलें होतें. तिच्या चालण्याचा

वेग अत्यंत वाढला होता. ती जंगलांत आली त्या वेळीं नुकतेंच कुठें अुजाडूं लागलें होतें. दिवसभर ती जंगलामध्यें भटक भटक भटकली; पण कुमाराचा किंवा त्याच्या टोळीचा कुठें मागमूस देखील लागला नाहीं. संध्याकाळ झाली तेव्हां हताश होअून ती अेका झाडाच्या बुंध्याला टेंकून बसली. आपला पाठलाग करण्यास सुरुवात झाली असेल ही भीतीहि तिला डांचत होती. पूर्व दिशा ढगाळून गेली होती आणि त्या मेघराशींतून मार्ग काढीत फिकटलेला पूर्णचंद्र हळूहळू वर येत होता. अितक्यांत दुरून ढोलक्याचे सूर येअूं लागले. हळूहळू त्यांत मानवी सूरहि मिसळूं लागले.

वर्षाराणी आनंदित होअून अुठली आणि सुरांचा शोध घेत निघाली. अखेर तिला वायुराजाच्या अुपासकांचा माग लागला. फेर धरून ते तीं चमत्कारिक सुरांतील गाणीं म्हणत होते, हंसत होते, नाचत होते. मध्यभागीं दोन पुष्पराशी रचल्या होत्या आणि अेका पुष्पराशीवर कुमार आणि दुसरीवर अेक टपोऱ्या डोळयांची आणि लाल लाल गालांची तरुण मुलगी लाजून बसली होती.

तें दृश्य पाहतांच वर्षाराणीच्या काळजांत धस्स झालें! कारण लग्नाच्या आधीं त्यांच्यामध्यें पण असा समारंभ करीत. पूर्णिमेच्या रात्रीं अुत्सव होअी व दुसऱ्या पूर्णिमेला लग्न लावीत. अेका क्षणांत तिला सर्व कांहीं अुमगलें. आत्यन्तिक त्वेषानें तिनें ओठ चावला. नकळत तिचा हात खांद्यावरील तीरकमठ्यावर गेला; परंतु तिनें संयम केला. घशांत दाटून आलेला हुंदका तिनें आंतल्या आंत गिळला आणि ती स्वतःशींच म्हणाली, 'म्हणे आपणां दोघांचाहि जन्म अेकमेकांसाठींच आहे. खोटं! खोटं!! साफ खोटं!!! दुष्ट माणसा, अरे, तुझ्यासाठीं तडफडत मीं अेकेक क्षण युगाप्रमाणें घालवला. आज ना अुद्यां तूं येशील म्हणून वाट पाहिली; शेवटीं मीच तुझ्याकडे धांवत आलें आणि तूं—! तुला माझी आठवण तर नाहींच; अुलट तूं अिथं नाचरंगांत दंग आहेस! ठीक आहे तर मग! जें मला मिळालं नाहीं तें मी दुसरीला कधींच मिळूं देणार नाहीं. ज्या अुत्कटतेनं मीं तुझ्यावर प्रेम केलं त्याच अुत्कटतेनं यापुढं तुझा तिरस्कार करीन!' वर्षाराणीनें तिटकाऱ्यानें मान फिरवली. ज्या वेगानें ती आपलें जंगल सोडून निघाली होती त्याच वेगानें ती जंगलाकडे परत चालली.

तिच्या टोळीमध्यें अेकच हलकल्लोळ माजला होता. तिला पहातांच सर्व जण तिच्याभोंवतीं गोळा झाले. ' जन हो ! ' तिनें बोलावयास सुरुवात केली, ' तुमच्या राणीला जबरदस्तीनं पळवून नेण्यासाठीं दुसऱ्या जंगलांत कट चालले असतांना तुम्ही स्वस्थ बसणार काय ? '

' राणीला पळविण्याचा कट ? ' सगळे जण आश्चर्यचकित होअून म्हणाले. ' होय ! ' वर्षाराणी म्हणाली. मग तिनें त्यांना सांगितलें कीं, जलदेवतेच्या साक्षात्कारामुळें तिला त्या शत्रुपक्षाच्या टोळीचा ठावाठिकाणा लागला. तिच्या भाषणानें आवेश येअून टोळींतल्या लोकांनीं लढावयाची जंगी तयारी केली. पुढच्या पुनवेच्या आंत वायुराजाच्या अुपासकांपैकीं व्यक्तीन् व्यक्ति ठार केली गेली पाहिजे, असें तिनें त्यांना बजाविलें. फक्त कुमारचें वर्णन करून तिनें त्याला जिवन्त पकडून आणावयास सांगितलें. वर्षादेवीनें स्वतः सर्वांचे बाण मंत्रून परजले.

वायुराजाचे अुपासक अुत्सवांत मग्न असतांनाच जलदेवतेच्या अुपासकांनीं त्यांच्यावर हल्ला केला. त्या दोनहि पक्षांत जंगी चकमक अुडाली ; पण वायुराजाचे अुपासक हरले. त्यांच्या टोळींतल्या बायकामुलांसकट सर्वांची कत्तल केली गेली आणि वर्षाराणीच्या आज्ञेप्रमाणें कुमाराला जिवन्त धरून आणण्यांत आलें.

तिच्या हुकुमानुसार त्याचे हातपाय जखडून त्याला अेका झाडाला बांधलें आणि भोंवतालीं कांटेरी झुडपांचें मोठें कुंपण केलें. विजयाचा अुत्सव संपेपर्यंन्त वर्षाराणीनें त्याच्याकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं. अेके दिवशीं रात्रीं सगळीकडे निजानीज झाल्यानंतर ती त्याच्याकडे निघाली आणि हातांत मशाल घेअून कुमाराजवळ येअून अुभी राहिली.

मशालीचा अुजेड तोंडावर पडल्यानंतर डोळे किलकिले करून त्यानें तिच्याकडे पाहिलें. त्यानें तिला ओळखलें. क्षीणपणानें तो हंसला. त्याचें तें हास्य अत्यन्त भेसूर होतें. मरणाच्या दारांत अुभ्या राहिलेल्या माणसाचें हास्य होतें तें ! त्याचें भुकेनें व्याकुळलेलें शरीर तांबड्या मुंग्या पोखरूं लागल्या होत्या. त्याची ती भयंकर अवस्था पाहून वर्षाराणीचें अंतःकरण तिच्या नकळत कळवळलें. मशाल बाजूला रोवून तिनें झटझटा त्याच्या अंगाभोंवतालचीं बंधनें तोडलीं आणि त्याला हळुवारपणें अुचलून बाजूला

आणलें. आपल्या अंगावर पांघरलेलें वस्त्र काढून तिनें तें त्याच्या अंगाभोंवतीं गुंडाळलें आणि त्याच्या तापलेल्या कपाळावर आपला थंडगार तळहात दाबून धरला.

कुमारचे डोळे पाण्यानें भरून आले. तो खोल आवाजांत म्हणाला, 'राणी, तुझं प्रेम होतं ना माझ्यावर? मग कां असा माझा निष्ठुरपणें सत्यानाश केलास?'

'कारण कुमार, तूं मला निष्ठुरपणें विसरून गेलास! अेवढंच नव्हे तर तूं दुसऱ्या मुलीला पत्करून माझा भयंकर अपमान केलास!'

'पण राणी, तुझ्याबरोबर येणं मला अशक्य होतं!'

'मग माझ्यासाठीं तडफडत कां नाहीं राहिलास? माझ्यासारखा कणाकणानं जळत कां नाहीं गेलास? जी माझ्या अधिकाराची जागा, ती दुसऱ्या स्त्रीला तू कां म्हणून दिलीस?'

'कारण तिच्याशीं विवाह करण्याची मला नायकानं आज्ञा दिली म्हणून!'

'हुंः! म्हणे नायकानं आज्ञा दिली! खरं प्रेम प्रेमाखेरीज दुसरी कुठलीच आज्ञा मानीत नाहीं!'

"नाहीं राणी! दुसरं कर्तव्य अधिक मोठं होतं. माझं तुझ्यावर प्रेम होतं म्हणूनच ना मीं त्या दिवशीं तुला आणि तुझ्या लोकांना जिवंत सोडलं! तुला वांचविण्यासाठीं तर मीं आमच्या टोळीला मागं परतविलं. तुझ्याकरितां मीं इतकं केलं आणि तूं मात्र काय केलंस? केवळ नाश! माझा आणि माझ्या भाअीबंदांचा भयंकर नाश! माझं ज्या मुलीशीं लग्न ठरलं होतं तिला देखील तूं ठार मारलंस! आणि आतां मलाहि मृत्यूच्या दाराशीं आणून ठेवलं आहेस!"

"तूं तिचा सोबती झालेला पाहण्यापेक्षां तुझं मरण पहाणं मला अधिक आवडेल! तुझं प्रेम फक्त मलाच हवं होतं. त्या प्रेमाचा वांटेकरी माझ्या मार्गांत अुभा राहिला तर त्याला चेंचून चेंचून ठार मारीन मी!" वर्षाराणीचे डोळे मत्सरानें धगधगून जळत होते. "कुमार! जर तूं मला मिळत नसलास तर मी दुसऱ्या कुणालाहि तुला हस्तगत करूं देणार नाहीं आणि त्याचबरोबर हेंहि लक्षांत ठेव कीं, माझं मीलन होईल तर तुझ्याखेरीज दुसऱ्या कुणाशींहि नाहीं!" बोलतां बोलतां तिनें कुमारचा हात आपल्या

मस्तकावर ठेवला आणि ती मोठ्यानें स्फुंदूं लागली. तिकडे मशालहि विझत आली होती.

तिच्या हातांतून निसटून कुमारचा हात खालीं कोसळला. त्याला अखेरची घरघर लागली होती. किती तरी वेळ वर्षाराणी भांबावल्यासारखी बसून राहिली होती. अितके दिवस तोंडहि न दाखवणारा पाअूस अेकाअेकीं कोसळूं लागला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दूर हाकलून दिलेले पहारेकरी आपापल्या जागीं परत आले. तों काय आश्चर्याची गोष्ट ! कुंपणामध्यें कुमारहि नव्हता कीं वर्षाराणीही नव्हती ! पहारेकऱ्यांनीं आरडाओरडा केला. कुंपणाभोंवतीं जलदेवतेच्या अुपासकांची अेकच गर्दी जमली; पण कुणालाच कशाचें आकलन होअीना. वर्षाराणीच्या शोधार्थ जो तो वाट दिसेल तिथें धांवूं लागला; पण अखेरपर्यंत तिचा पत्ताच लागला नाहीं. सर्व जण हताश होअून परत जंगलाकडे आले !

कुणी म्हणालें कीं, पाअूस पडला तेव्हां प्रत्यक्ष जलदेवता खालीं अुतरली आणि तिनें वर्षाराणीला व त्या तरुण वायुराजाच्या अुपासकाला आपल्या-बरोबर अुचलून नेलें. कुणी म्हणालें, वर्षाराणीच त्याला शासन करण्या-करितां अज्ञात स्थळीं घेऊन गेली; पण वर्षाराणी त्या रात्रीं कुंपणाकडे कां गेली हें मात्र कुणालाच समजलें नाहीं. त्यांनीं तिच्यासाठीं किती तरी दिवस शोध केला आणि मग अेके दिवशीं नवी वर्षाराणी निवडण्याच्या अुत्सवाला सुरुवात झाली.

‘ कौमुदी, ’
दिवाळी अंक १९५१.

* * *

# पतिधर्म : : ९

कांहीं कांहीं माणसें केवळ दुसऱ्यासाठींच जगत असतात. स्वतःचें भिन्न असें जीवन त्यांना जणुं नसतेंच! माओींच्या बाबतींत असेंच झालें होतें. त्या केवळ अण्णांसाठींच जन्माला आल्या होत्या. अण्णांच्या जीवनप्रवाहांत त्यांनीं आपला जीवनप्रवाह बेमालूमपणें मिसळून टाकला होता. त्यांचें जिणें सुखाचें व्हावें म्हणून माओींनीं स्वतःचें सर्वस्व त्यांच्या पायांशीं वाहिलें होतें. अण्णांचें सुख तें त्यांचें सुख होतें. अण्णांचें दुःख तें त्यांचें दुःख होतें. अण्णांच्या आवडीनिवडींशीं त्यांनीं स्वतःला निगाडित करून टाकलें होतें. आओी-बापांनीं त्यांची अण्णांशीं जन्मगांठ घातल्यानंतर त्यांनीं अण्णांची पाठ सांवलीप्रमाणें सोडली नव्हती. अण्णांचें सुख, अण्णांचा आनंद, अण्णांचा अुल्हास! बस्स. ह्यापलीकडे माओींनीं कसलाहि विचार केला नव्हता. त्यांतून त्यांना मूलबाळ नसल्यानें त्यांच्या वात्सल्याचाहि सारा ओघ अण्णांवरच अेकवटला होता.

अण्णांशीं मिळतें-जुळतें घेणें पहिल्यांदां त्यांना जड गेलें होतें; पण यापुढें फक्त आपल्याला अण्णांचाच विचार करावयाचा आहे असें त्यांनीं मनाशीं पक्कें ठरविलें होतें. म्हणूनच लग्न झाल्या दिवसापासून त्यांनीं आपल्या आवडीनिवडींचा चोळामोळा करून त्यांना दूरच्या कोंपऱ्यांत फेंकून दिलें होतें.

अण्णांना गार पाण्याची आंघोळ फार प्रिय होती. अैन कडाक्याच्या थंडींतसुद्धां ते गार पाण्याचे तांब्ये अंगावर घेत. आपला नवरा थंडीच्या पहांटेला सुद्धां शीत स्नान करतो आणि आपण मात्र गरम पाण्याचे सुख-सोहाळे भोगतों, हें माओींच्या मनाला अत्यन्त लागलें. त्या वेळेपासून त्यांनीं

गार पाण्याची आंघोळ सुरू केली. गरम पाण्याची ऊब अनुभवण्याची संवय असलेल्या त्यांच्या शरीराला ती दाहक शीतलता सहन होईना. त्यांना वारंवार पडसें होऊं लागलें, डोक्यांत चमका मारूं लागल्या, एकदां तर त्यांच्या अंगांत तापहि फणफणला; परंतु माईंचा निश्चय तुटला नाहीं, त्यांचा आग्रह सुटला नाहीं! एकदां मनाशीं धरलेला करार त्यांनीं मोडला नाहीं. सकाळीं उठून त्या नळाखालीं थंड पाण्यानें स्नान करीत. अण्णा उठायच्या आंत स्नानानें शुचिर्भूत होऊन त्या वेणी-फणी करायला बसत. आपल्या भव्य कपाळावर कुंकवाचा लाल भडक टिळा रेखतांना त्यांना कोण अभिमान वाटे! एखाद्या कलावन्ताच्या हलुवार हातानें त्या कुंकवाच्या गोल कडा कोरून काढीत.

एकदां अण्णा उठून स्नानाला बसले म्हणजे त्या आपलें लुगडें व्यवस्थित-पणें खोचून अण्णांसाठीं 'स्पेशल' चहाची तयारी करूं लागत. अण्णांना जरा कडवट आणि जादा साखर असलेला चहा आवडे. तो चहा दूधसाखरे-सकट जास्त उकळावा लागे. वास्तविक पहातां माईंना आपल्या माहेरीं सकाळीं दुधाचा पेला तोंडाला लावण्याची संवय होती. चहाच्या नुसत्या वासानें सुद्धां त्यांना ओकारी येत असे; पण अण्णांना चहा आवडे म्हणून त्याहि चहा घेऊं लागल्या होत्या. हळूहळू त्याचीहि संवय त्यांना जडली.

एकदां चहा उरकला म्हणजे त्या स्वयंपाकाला लागत. अण्णांना काय आवडतें नी काय आवडत नाहीं हें संवयीनें माई बरोबर ओळखूं लागल्या होत्या. त्या बाबतींतहि त्यांनीं अण्णांची रुचि बिघडूं नये म्हणून स्वतःची आवड मुरडून टाकली होती. एकूण सगळ्याच बाबतींत माईंनीं आपलें स्वतंत्र अस्तित्व पार मारून टाकलें होतें. सकाळीं उठल्यापासून तों रात्रीं अंथरुणाला पाठ लागेपर्यंत माई अण्णांच्या सेवेमध्यें तीळ म्हणून उणा ठेवीत नसत. गरम तेलानें त्यांचीं पावलें रगडतां रगडतां त्यांनीं एकदां डोळे मिटले आणि दीर्घ श्वासोच्छ्वासाला सुरुवात केली म्हणजे मगच माईंना सुखाची झोंप लागे.

लहानपणापासून माईंच्या आईनें त्यांना जशी शिकवण दिली होती तसेंच आचरण त्यांनीं आजतागायत ठेवलें होतें. त्यांची आई मोठी धार्मिक, सात्त्विक आणि व्रतशील बाई होती. पुराणांतल्या पतिव्रतांच्या कथा

अैकतां अैकतां डोळ्यांतून पाणी सांडूं लागावें, अशा स्थितींत माअी लहानाच्या मोठ्या झाल्या. वयाच्या चौदाव्या का पंधराव्या वर्षी त्यांचें लग्न झालें आणि तेव्हांपासून आयुष्याला अेक कडकडीत व्रत मानून त्यांनीं संसाराचीं सूत्रें नियमानें संभाळलीं होतीं. आज त्यांच्या लग्नाला बावीस-तेवीस वर्षें होअून गेलीं होतीं. सदतीस वर्षांचें वय होतें त्यांचें; पण अेवढ्या अवधींत बालबोध आणि साधें सरळ वळण जरासुद्धां बदललें नव्हतें. मुलाबाळांची काय ती मोठी अुणीव होती घरांत; पण त्याबद्दल आपल्या दैवाला दोष लावून त्यांनीं अखेर तीहि आशा सोडून दिली होती, तेंहि दुःख गिळून टाकलें होतें. त्यासाठीं झुरणीला लागून त्यांनीं संसाराचें सुख ढकलून टाकलें नव्हतें; अुलट त्यांचें अण्णांवरलें प्रेम अधिकच वाढलें होतें. अण्णांची ओढ अधिकच दृढावली होती.

अण्णांची त्यांना अितकी काळजी होती कीं, त्यासाठीं त्यांनीं घराचा अुंबरठासुद्धां कधीं फार वेळां ओलांडला नव्हता; मग परगांवीं जाण्याची तर गोष्टच सोडा! माहेरची आंसहि त्यांनीं आंचवून टाकली होती. कित्येक वर्षांत त्यांनीं माहेरची वाट धरली नव्हती. अेकदां त्यांची आजी दुखणाअीत झाली. तिला माअीला पहायची भारीच अुत्कंठा लागली. ‘अेकदां माअीला बोलावून घ्या रे कुणी तरी!’ असा जप ती अहोरात्र करूं लागली. माअींचें घर अितकें दूर होतें कीं चटकन् जाअून येण्यासारखेंहि नव्हतें. माअींना पत्रांवर पत्रें आलीं, निरोपामागून निरोप आले. माहेरच्या आठवणीनें त्यांच्या डोळ्यांनाहि आंसवांची धार लागली; पण तिकडे नेअून पोंचवणार कोण? अण्णांची नोकरींतून सुटका होण्यासारखी नव्हती. माअी अेकट्या जाण्याअितक्या धीट नव्हत्या. मनाच्या त्या कातर नि हळव्याच होत्या जराशा. अखेर त्यांनीं आपल्या भावालाच घरीं बोलावलें. तांतडीनें भाअू निघून आला. माहेरला जाण्यासाठीं माअींनीं गांठोडें बांधलें. तिकडे जाण्याची तर ओढ लागली होती; पण चार दिवसांसाठीं घर सोडायलाहि मन तयार नव्हतें. तळहातांत जीव गोळा करून ज्याच्या भिंती नि जमिनी सारवल्या तें प्राणापेक्षांहि प्रिय घर! ज्याच्या चौकटींत माअींची अमोल दुनिया सांठवलेली होती तें जिवाला नि देहाला आधार देणारें घर!! कुंकवाच्या धन्याच्या पाअूलखुणांनीं ज्याची जमीन पवित्र झाली होती तें आपल्या पतीचें

घर ! ! ! माओींच्या अंतःकरणांत कालवाकालव सुरू झाली. संध्याकाळच्या गाडीनें निघायचें असें ठरलें होतें. अण्णा यायची वाट पहात माओी थांबल्या होत्या. अण्णांच्या रात्रीच्या फराळाची तयारी करून त्या जरा पाटावर लवंडल्या होत्या, अितक्यांत अण्णा आले; पण कपाळावर चिंता गोळा झाली होती. डोळ्यांत चमत्कारिक लाली दाटली होती. ओंठ पार सुकून गेले होते. माओींच्या दृष्टीला फरक जाणवला. चटकन् अुठून त्यांनीं अण्णांच्या कपाळावर हात टेंकला तों तापानें ते फणफणले होते. बांधलेलें गांठोडें माओींनीं सोडलें. अण्णांनीं त्यांना खूप समजावलें. घाबरायचें कारण नाहीं म्हणून सांगितलें. माहेरची मंडळी काय म्हणतील अशी भीतीहि दाखवली; पण माओींनीं पाअूल उचललें नाहीं ! माहेराकडे निरोप देअून माओी भावाला म्हणाल्या, " दादा, ते आजारी असतांना मला तिकडं येणं शोभेल का ? आजीला म्हणावं, माओीचं चुकलं; पण नवऱ्याच्या मायेपोटीं तिनं तुला टाकलं ! आओीला सांग कीं, तुझी लेक खुशाल आहे. तिच्या नवऱ्याचं अुदंड प्रेम आहे तिच्यावर. त्याच्या छायेखालीं राणीसारखी नांदते आहे म्हणावं ती ! " भाअू परतला आणि माओी पतिघरींच राहिल्या.

अण्णांच्या सेवेंत अंतर पडूं नये म्हणून माओींनीं सारे मोह असेच टाळले होते. अेके दिवशीं अण्णा रजा घेअून आपल्या गांवीं जाण्यास निघाले. शेतीचें कांहीं निकडीचें काम निघालें होतें. माओीहि त्यांच्याबरोबर जाण्यासाठीं तयार झाल्या होत्या; पण अैनवेळीं त्यांची नणंद आपल्या नवऱ्याबरोबर त्यांच्याकडे अुतरावयास आली. घरांत पाहुणेमंडळी आलेली. अशा वेळीं माओींचें पाअूल घराबाहेर कसचें निघतें ? शेवटीं अण्णा अेकटेच गेले. त्या प्रसंगानंतर माओींच्या आयुष्याला कांहीं विचित्रच कलाटणी मिळाली.

कारण अण्णा गांवाहून जे परत आले ते पार बदलून आले. ते परत आले त्या वेळीं त्यांची घराची ओढ पूर्णपणें सुटली होती. माओींशीं बोलणें त्यांनीं हळूहळू सोडून दिलें. संध्याकाळीं घरीं परत आल्यावर ते कपाळावर तळहात दाबून निमूटपणें पडून रहात. माओी ' कपाळ चोळूं का ? ' म्हणून विचारूं लागल्या कीं, ते जोरानें खेकसत ' कांहीं नको. माझं डोकं दुखत नाहीं. ' रात्रीं पाय चेपायला जवळ आल्या कीं त्रासलेल्या मुद्रेनें ते मान फिरवीत आणि पाय आंखडून घेत. पाय दाबलेले त्यांना आवडत नाहींत हें पाहून

माओींनींहि तो क्रम सोडून दिला होता. अलीकडे अण्णांची मर्जी आपल्या-वरून कां अुडाली आहे हें त्यांच्या भोळया मनाला कांहीं अुमगत नसे. प्रथम प्रथम त्या घाबरल्या, बावरल्या; पण आतां मात्र वेदनांची कणकण त्यांच्या अंतःकरणाला जाणवूं लागली. अण्णा नसले म्हणजे त्यांच्या डोळयांच्या कडा आंसवांनीं ओलावत; पण अण्णांचीं पावलें वाजलीं म्हणजे चटकन् पदरानें डोळयांतलें पाणी त्या पुसून टाकीत. तशा अवस्थेंतहि संसारांतलें माओींचें लक्ष मुळींसुद्धां अुडालें नव्हतें. अेका हातानें गदगदलेलें हृदय दाबून धरून रोजचा नेमधर्म त्या न चुकतां पार पाडीत होत्या.

कांहीं दिवसांनीं अण्णांची गांवाकडे पुन्हां अेक फेरी झाली. दुसरी झाली, तिसरी झाली. वारंवार गांवाकडे ते वळूं लागले आणि मग साऱ्या फेऱ्या अेकदम बंद झाल्या. अण्णांचा स्वभाव अधिकाधिक तापट नी चिडखोर बनूं लागला आणि अेके दिवशीं अचानक माओींना साऱ्या अनर्थाचें मूळ कळून चुकलें!

अेके दिवशीं गांवाकडचे गजाभाअू अचानकपणें दुपारीं येअून ठेपले. अण्णा नोकरीवर गेले होते. माओींनीं अतिथिधर्माप्रमाणें गजाभाअूंना पिठलें-भात करून वाढला. गजाभाअू शांतपणें जेवीत होते. माओी स्वयंपाकघराच्या अुंबरठ्यावर स्वस्थपणें टेकल्या होत्या. म्हणतां म्हणतां अेकदम त्यांच्या डोळयांना धार लागली. त्या चटकन् बोलून गेल्या, ‘ गजाभाअू, अलीकडे त्यांचं घरांतलं लक्षच अुडालं आहे हो ! ’

गजाभाअू अेकदम अुसळले, ‘ कसं नाहीं अुडणार? तिकडे गांवालीं अुडाणटप्पूपणा करायला मिळत असतांना तुमच्याकडे लक्ष रहाणार कसं त्यांचं? ’ माओी अेकदम दचकल्या आणि गजाभाअू तडातडा बोलून गेले! त्यासाठींच खरें पहातां ते अिकडे निघून आले होते. अण्णांनीं आपलें गांवांकडचें घर अंबूताई नांवाच्या अेका विधवा बाओीला भाड्यानें दिलें होतें. ती आणि तिची सतरा-अठरा वर्षांची मुलगी यमी अशा दोघी जणीच रहात असत. अगदीं गरिबीची स्थिति होती त्यांची. त्या भाडें कुठलें देणार? अण्णाच अुलट त्यांना पैसे देत असत अधूनमधून. माओींनींच त्यांना कळवळून अेकदां तसें करण्यास विनवलें होतें. त्या दोघीहि अण्णांबद्दल अत्यंत कृतज्ञता बाळगून होत्या. अण्णा शेतीच्या कामासाठीं गांवीं गेले कीं

त्यांच्या खाण्यापिण्याची व्यवस्था त्याच करीत असत. अण्णांनाहि त्यांच्याबद्दल फार आपुलकी वाटूं लागली आणि तशा स्थितींतच अण्णांच्या हातून ती चूक झाली. यमीच्या बाबतींत त्यांचें पाअूल वांकडें पडलें !

अण्णांचेंहि सर्वस्वीं चुकलें होतें असें नाहीं. यमीनेंहि त्यांना अुत्तेजन दिलें. सतरा आठरा-वर्षांची वाढलेली पोर !, कुणी बघायला नाहीं म्हणून लग्न जमत नव्हतें. गांवांतले गुंड लोक छळायला टपलेलेच होते. म्हणून बिचारी घराबाहेरहि फारशी जात नसे. घरांत बसून बसून नुसती कुढून चालली होती. अण्णांनीं चौकशी केल्यामुळें तिचें अुत्सुकलेलें मन भलतीकडे बहकलें. अंबूताअींचा धाक न जुमानतां तिनें पापाचा चोरटा मार्ग पत्करला. त्याचा परिणाम व्हायचा तोच झाला. अण्णांपासून तिला दिवस गेले. गांवामध्यें गवगवा झाला. गुडघ्यामध्यें मान घालून माजघराच्या अंधारांत बसायची पाळी यमीवर आली. अंबूताअीनें गजाभाअूला बोलावून घेतलें आणि हंबरडा फोडून अण्णाकडे धांव घेण्याची विनंति केली. तीच कहाणी सांगण्यासाठीं गजाभाअू तडकाफडकीं निघून आले. कांहीं तरी मार्ग निघेल ह्या आशेनें दोघी मायलेकी गांवाकडे त्यांची वाट पहात थांबल्या होत्या.

माअींमधली ‘गृहस्वामिनी’ खवळून अुठली. चाळीस वर्षांच्या अण्णांकडून हा पोरकटपणा घडावा हें त्यांना मुळींसुद्धां सहन झालें नाहीं. हलक्या हातानें त्यांनीं संसाराची अिमारत हळूहळू बांधली होती आणि अखेर तिला भला मोठा तडा जायचा तो गेलाच होता ! माअींचें मन खळबळून आलें. गदगदां हुंदके देअून त्या मनसोक्त रडल्या. हलके हलके त्या शांत झाल्या. अितका वेळ शोकाकुल झालेलें त्यांचें मन आतां विचारांचें ओझें पेलण्याअितकें सावध झालें.

आणि मग कशी कोण जाणे त्यांनीं यमीला पाहिली नसतांहि तिची कारुण्यपूर्ण मूर्ति त्यांच्या डोळ्यांसमोर रेखून अुभी राहिली. यमीची गरोदर मूर्ति ! अरेरे ! हीच अवस्था आपल्याला प्राप्त व्हावी म्हणून त्या कितीदां तरी तळमळल्या होत्या, तडफडल्या होत्या. त्यांना हवेंहवेंसें वाटणारें तें अपत्य नशिबाच्या अवकृपेमुळें त्यांच्या पोटीं न धरतां यमीकडे वाट चुकून गेलें होतें. माअी अेकदम कळवळल्या. नाहीं, नाहीं ! तें अपत्य जगणें आवश्यक होतें. त्याला जगविणें त्यांचें कर्तव्य आहे असें त्यांना वाटलें.

आपल्या पतीच्या वंशाला फुटणारा हा नवा कोंब मायेच्या सांवलींत वाढला नाहीं तर...त्यांच्या डोळ्यांसमोर भयानक चित्रें तरळूं लागलीं—यमी रडत-ओरडत धांवते आहे आणि गांवांतले गुंड दगड घेऊन तिला हाणीत तिचा पाठलाग करीत आहेत—अेका अुकिरड्यावर नुकतेंच जन्मलेलें अेक लाल-चुटुक कोवळें तान्हें कुणी तरी आणून टाकलें आहे. तें टाहो फोडून रडतें आहे आणि अुकिरड्यावर दोन गिधाडें घिरट्या घालीत आहेत—

काळीकुट्ट अंधारी विहीर! अमावास्येची भयदायक रात्र. अितक्यांत पाण्यांतून डुब्ब असा आवाज येतो. अंबूताअी हंबरडा फोडीत ओरडतात, 'यमे, कशाला ग कार्टे मला मागें ठेवून जीव द्यायला गेलीस?'

त्या भेसूर चित्रांची धांवपळ पाहून माअींच्या अंगावर कांटा अुभा राहिला. थरथरत्या शब्दांनीं त्या गजाभाअूंना म्हणाल्या, "नाहीं, गजाभाअू, तें मूल जगायलाच पाहिजे! जा, तुम्ही आधीं गांवाला जाअून अंबूताअीला अन् त्या मुलीला अिकडे घेअून या. मी त्यांची सगळी व्यवस्था करीन. मी तें मूल वाढवीन. आपण कुणालाहि समजूं देणार नाहीं कांहीं! मी सारं कांहीं नीट करीन; पण तें मूल जगलं पाहिजे. यमीच्या आयुष्याचं मातेरं होतां कामाचं नाहीं गजाभाअू!"

गजाभाअूंच्या डोळ्यांतहि पाणी दाटलें; 'पण माअी...' ते म्हणाले, 'पण नाहीं आणि कांहीं नाहीं. ते यायच्या आंत तुम्ही अुठा! अंबुताअीला म्हणावं संकोच करूं नकोस. माअी तुझा हेवादावा करणार नाहीं. तिथं गांवांत कुठवर रहाणार लोकांचीं बोलणीं अैकत? अिथं मायेच्या घरीं ये. माअी तुझं स्वागत करील आनंदानं. तिला सांगा कीं, माअीला मूल नसलं तरी आअीचं हृदय आहे. कांहीं झालं तरी माअी स्त्री आहे आणि स्त्रीचं दुःख तिला समजतं म्हणावं!' गजाभाअू मुकाट्यानें अुठले.

गजाभाअू गेले आणि अण्णा आले. चहाचा कप त्यांच्या पुढ्यांत ठेवीत शांत चित्तानें माअी म्हणाल्या, 'यमी येणार आहे अिथं!' 'कोण? यमी?' तिरसटपणें अण्णांनीं विचारलें. 'मला सारं कांहीं समजलंय्! मी रागावलें नाहीं. यमीला घेअून मी माहेरीं जाणार आहे. कुणाला सांगणार-सवरणार नाहीं. आतां मी परत यायला वेळ लागेल. तोंवर घर नीट सांभाळा!'

माओींच्या डोळयांत पाणी अुभें राहिलें. त्यांना वाटलें अण्णा भांडतील-तंडतील; पण वादळ अुठलें नाहीं, निःशब्दपणें ते घराबाहेर पडले! माओींचा मोठेपणा पाहून ते गहिंवरले होते!

'नवयुग'
२३ डिसेंबर १९५१.

* * *

## विस्कटलेली घडी : : १०

एकदां तिशी अुलटून गेली म्हणजे नाहीं म्हटलें तरी बऱ्याच स्त्रियांमध्यें कांहीं तरी चमत्कारिक बदल घडून येतो. अिष्ट बदल झाला, स्वभावांतल्या सत्प्रवृत्ति दृढ झाल्या, तर ठीक! नाहीं तर स्त्रीच्या आयुष्याला कांहीं तरी विपरीत वळण लागतें. तिशीचा अुंबरठा अेकदां ओलांडला कीं तिच्या अंगांतले सर्व दोष अधिकाधिक बळावूं लागतात. तिच्या हट्टीपणाला बाळसें चढूं लागतें. तिचा घमेंडखोरपणा तिच्या वाढत्या आकाराबरोबर फुगायला लागतो. तिचें अज्ञान आणि तिचा मूर्खपणा ह्यांमध्यें जणुं पुढें धांवण्यांत शर्यत जुंपते. तिच्या स्वभावांतलीं सारीं वेडींवांकडीं वळणें आणखीनच वळसे घेअूं लागतात. पंचविशीपर्यंतचा अल्लडपणा थिल्लर बनूं पाहतो.

आणि मग...मग संसारांतली गोडी विटूं लागायची हें अगदीं ठरलेलेंच. आजपर्यंत नाजुक हातांनीं गुंफीत आणलेले वैवाहिक जीवनाचे धागे अचानक तटातट तुटूं लागतात. अगदीं पाहतां पाहतां संसाराचा अिमला धडाधड कोसळूं लागतो. त्यामुळें स्त्रीच्या आक्रस्ताळी स्वभावाला धार चढते. कांगावा करण्याची खोड वाढूं लागते. हट्टीपणानें ती फिसकटलेला वायदा जुळवूं पहाते; पण तो जुळत नाहीं. तें जमत नाहीं. हें तिला साधत नाहीं. असें कां होतें?

खरोखरीच असें कां होतें हें अेक कोडें आहे मोठें! कांहीं का असेना, पण असें होतें खरें. शालिनीच्या बाबतींत आज हेंच घडलें होतें. जें होणार नाहीं म्हणून ती अितर बायकांना मोठ्या घमेंडीनें सांगत होती तेंच नेमकें घडून आलें होतें. आपलें शिकंदर नशीब आपल्याला कधींच धोका देणार नाहीं

ही तिची फुशारकी अखेर पोकळच ठरली होती. जी स्त्रीसुलभ चातुरी आपल्यांत आहे म्हणून ती नाकावर अभिमान नाचवीत होती ती चातुरी राजाभाअूला मात्र ओंगळ आणि असह्य वाटत होती हें तिला आजवर कुठें समजलें होतें ? पायरीपायरीनें आपण राजाभाअूच्या मनांतून खालीं अुतरत आहोंत हें तिच्या लक्षांत कुठें आलें होतें ? घसरत घसरत ती थेट पायथ्याशीं येअून आदळली होती आणि आतां कुठें डोक्यांत लख्ख प्रकाश पडला होता; पण आतां काय उपयोग होता ?

रुचि बिघडायची ती बिघडलीच; घडी विस्कटायची ती विस्कटलीच, हें तिला अुमगत होतें म्हणूनच ती अधिक आकस्ताळी बनूं पहात होती. पूर्वीचा तिचा सहज गोडवा स्वभाव मायावी भुलावणीचें स्वरूप धारण करूं लागला होता आणि किळसवाणा दिसूं लागला होता.

दुपारींच मनाशीं तिनें खूणगांठ बांधली आणि ती चहाच्या तयारीला लागली. तिला माहीत होतें कीं, राजाभाअू आतां पूर्वीसारखा घरच्या ओढीनें धांवत येत नाहीं. घरांत पाअूल टाकल्यावर त्याचा दमलेला चेहरा अुल्हासित होत नाहीं. आपल्या नजरेला नजर भिडतांच त्याच्या डोळ्यांत आसक्ति चमकत नाहीं. अुलट तो आपल्या चेहऱ्याकडे पहाण्याचें टाळतो. त्याच्या पुढ्यांतून येअूं-जाअूं लागलों म्हणजे तो बळेंच मान खालीं घालतो. आपण तोंडांतून शब्द काढायचा अवकाश कीं त्याच्या कपाळावर आठी अुमटते. पूर्वीसारखा तो थट्टामस्करी करीत नाहीं, कीं हास्यविनोद करीत नाहीं. आपलें प्रत्येक बोलणें तो तिरसटासारखा अुडवून लावतो. दर खेपेला तो आपल्याला मूर्ख ठरवतो, बेअक्कल म्हणतो. आपण कधीं चांगला पोषाक केला तर तो पहिल्या-प्रमाणें 'आहे बुवा !' म्हणत नाहीं, कीं अुषारमेशच्या नकळत आपल्या गालांवर चटकन् ओंठहि टेकीत नाहीं. अुलट अुर्मटपणानें ओंठ पुढें आणीत खेकसतो, 'हा कुठला घाणेरडा भडक रंग काढलास आज ?' राजाभाअूला आपण आवडेनाशा झालों आहोंत हेंच खरें ! राजाभाअूला आपल्याबद्दल मनस्वी तिटकारा वाटूं लागला आहे, आपलें दर्शनसुद्धां त्याला नकोसें वाटतें हेंच खरें !

आठवणी काढतां काढतां शालिनीच्या डोळ्यांत टचकन् पाणी अुभें राहिलें. क्षणभर तिचें हृदय आर्तपणांत विरघळलें; पण स्वतःच्या दुबळे-

पणाचीच तिला चीड आली. ज्या माणसानें आपला अेवढा अपमान केला, ज्यानें आपल्याशीं अेवढें अकारण वैर धरलें आहे त्याच्यासाठीं डोळ्यांत पाणी आणायचें ? शीः ! आपल्यासारख्या स्वाभिमानी स्त्रीला हें शोभत नाहीं !

अेकीकडे ती राजाभाअूबद्दलचा राग मनांतल्या मनांत असा घुसळीत होती आणि दुसरीकडे प्रत्यक्ष हातांनीं मात्र त्याच्या चहाची तयारी करीत होती. त्याला आवडणारे दहींवडे ती करणार होती. मनांतला अभिमान आणि कृतींतील लाचारी असा विरोधी संयोग आज झाला होता.

अशी पाळी आपल्यावर कधीं काळीं येअील असें शालिनीला स्वप्नांतसुद्धां वाटलें नव्हतें. आपल्या कर्तबगारीबद्दल तिला केवढा विश्वास होता ! लग्नाच्या मंडपांतून ती घरीं आली ती केवढ्या कुर्र्यानें, केवढ्या मिजाशीनें ! काय नखरेल ताठा भरला होता तिच्या अंगीं ! शालिनीच्या लग्नाचा विचार जेव्हां तिचे आईवडील करूं लागले त्या वेळीं त्यांनीं प्रथम स्थळ पाहिलें राजाभाअूचें. राजाभाअूनें तिला पाहिल्याबरोबरच पसंत केलें. आतां शालिनी मोठी देखणी होती अशांतला भाग नाहीं. तिचें नाक बोजड होतें आणि ओंठही निबरट होते ; परंतु गोरापिठ्ठ रंग, कुरळे केस आणि व्यवस्थित बांधा यांमुळें ती अेकदम पाहिल्यावर डोळ्यांत भरत असे. त्या मानानें राजाभाअू अुंचनीच आणि अैटबाज होता. अेका चांगल्या पुरुषानें पहिल्या भेटींतच आपल्याला पसंत केलें या घटनेमुळें शालिनी केवढी चढून गेली ! सहसा जें घडत नाहीं तें तिच्या बाबतींत घडलें होतें. लग्नाच्या बाजारांत पहिलाच सौदा लाखमोलाचा झाला होता. अितर देखण्या आणि गुणी मुलींनाहि याच बाजारांत किती रखडावें लागत होतें ! अेकेक सौदा पटवितांना कोण मनस्ताप सहन करावा लागत होता ! या यशानें शालिनी केवढी हुरळून गेली ! तिच्या बापाकडून अेकुलत्या अेक मुलीसाठीं मोजल्या जाणाऱ्या भरगच्च हुंड्यावर राजाभाअूंची थोडीफार नजर आहे हें ती साफ विसरून गेली.

वाजत-गाजत थाटांत लग्न झालें. आअीबापांनीं हौसेनें जागा बघून दिली आणि झोकाचें बिऱ्हाड थाटून दिलें. संसाराला सुरुवात झाली. महाबळेश्वराला मधुचंद्रहि साजरा केला. राजाभाअूला शालिनीवांचून घडीभरहि करमेनासें झालें. कामावर जातांना तो अेवढेंसें तोंड करून जाअी. काम

संपल्यावर संध्याकाळीं धांवत-दौडत परत येअी. मग हंसत-खेळत चहापाम अन् संध्याकाळचें फिरायला जाणें! कधींमधीं सिनेमा नी रेस्टॉरंट, कधीं छोट्याशा सहली-सुखाला नुसता पूर आला होता. भाग्य अगदीं अुतूं जात होतें. चोवीस तास राजाभाअू 'शालू, शालन्, शाले' अशा विविध नामावळींचा जप करीत होता आणि शालिनीचा ताठा नुसता फुलून फुलून येत होता. अंगावर हर्षाचे रोमांच तरारून अुठत होते!

शालिनीला आभाळ ठेंगणें वाटूं लागलें. मैत्रिणीसुद्धां म्हणूं लागल्या, 'लग्न झाल्यापासून शाली काय चढून गेली आहे अगदीं! जसा कांहीं माज चढलाय् नुसता. रस्त्यानं भेटली तर ढुंकूनहि पहात नाहीं! लाडे लाडे माना वेळावीत नवऱ्याकडे पहात चालते. बाकी नवरा छान मिळाला आहे हं शालीला! कांहीं म्हणा, शाली मोठी भाग्याची खरी!'

खरोखरीच शालिनी मैत्रिणींशीं अगदीं फटकून वागत होती. कांहीं झालें तरी आपल्या मैत्रिणींना आपल्या भाग्याचा हेवा वाटतोय् ह्या जाणिवेनें ती मोहरून गेली होती.

अेकदां तिच्या मैत्रिणी तिचें बिऱ्हाड पहायला मोठ्या हौसेनें आल्या. शालिनी प्रथम त्यांच्याशीं धड बोलायला तयार नव्हती. त्याच बिचाऱ्या नाना तऱ्हेचे विषय काढून बोलत होत्या. ही अुगीच हंसलें न हंसल्यासारखें करी आणि गप्प बसे. तिला प्रत्येकीमधील दोष अुठून दिसत होते. ज्यांच्या गळ्यांत गळे घालून ती आजवर फिरली त्याच तिलां नकोशा झाल्या होत्या. विमलची हंसतांना हिरड्यांसकट अुठून दिसणारी बत्तिशी तिला कधीं नव्हे अितकी तिरस्करणीय वाटूं लागली होती. लिलीच्या काळ्या रंगाला ती वारंवार नाक मुरडूं लागली होती. शशीच्या किनऱ्या आवाजाचा तिला अतिशय कंटाळा आला होता. त्या तिघीहि बिनलग्नाच्या राहिल्या होत्या म्हणून तिला कोण आनंद झाला होता! त्यांना हिणविण्यासाठीं ती खवचटपणें म्हणाली, 'अे! तुम्ही पण आतां लवकरच लग्नं करून टाका ग. ती माली केव्हांची लग्न करतीय. तिचे वडील तिला दाखवून दाखवून कंटाळलेत म्हणे. कुरूप म्हणून तिला कुणी पसंतच करीत नाहीं! त्या कुमुदचंहि तसंच. काय ढब्बी झाली आहे ती! काय तिचं होणार आहे देवाला ठाअक! अे, त्या कमीच्या तोंडावर काय भयंकर पुटकुळ्या

आल्या आहेत ग ! शीः ! मला तर किळसच येते तिची ! कोणाच्या नाशिबांत हें ओंगळ ध्यान लिहिलं आहे कुणास ठाअूक ! आपण आपल्या भाग्यवान् आहोंत बुवा ! राजानं मला तर नुसतं पाहिल्यावर पसंत केलं ! ' विमल, लीला, शशी बिचाऱ्या मान खालीं घालून अैकत होत्या. त्यांतल्या त्यांत विमल जरा लोचट होती. ती शालिनीची स्तुति करूं लागली. मग तर काय शालिनीला काय बोलूं नी काय नको असें झालें. अमकींचें नवऱ्याशीं पटत नाहीं आणि तमकीला नवऱ्यानें टाकून दिलें आहे, अमकीचा नवरा दुसऱ्या बाअीच्या नादीं लागला आहे आणि तमकी नवऱ्याच्या नाकावर टिचून चाळे चाळे करते अित्यादि अित्यादि भानगडी ती खुलवून सांगूं लागली. प्रत्येक स्त्रींत शालिनीला दोष आणि अवगुण दिसत होते. कुठें कुणाचें फिसकटलें आहे हें अैकतांना तिच्या कानांना धन्य धन्य वाटत होतें !

राजाभाअूच्या खांद्याला खांदा घासत त्याच्याबरोबर बाहेर जातांना तिची आत्मप्रौढी पराकोटीला जात असे. कुठें कुणी जरा कुरूप मनुष्य दिसला कीं राजाभाअूला खांद्यानें ढकलून ती म्हणे, ' अे राजा, तो बुवा बघ काय जाडा आहे, ध्यान आहे अगदीं ! ' कुठेंहि अेखादें जोडपें दिसलें म्हणजे बायकोचे दोष तर तिला अुठून अूठून दिसत. ती राजाभाअूचा हात दाबून म्हणे, ' राजा, त्या बाअीला तें गुलाबी पातळ शोभतहि नाहीं. शीः ! कसली रद्दड बायको आहे त्याची ! '

दोष, दोष, दोष ! शालिनीला सारें जग विकृत, ओंगळ, अजागळ दिसूं लागलें होतें. दैन्य आणि दारिद्य यांबद्दल तिला तिटकारा वाटूं लागला होता. लग्न झाल्यावर कांहीं दिवस हें ठीक होतें. अेखादें वर्ष असलें वागणें शोभून गेलें असतें; पण वर्षामागून वर्षें अुलटलीं तरी शालिनी पालटली नाहीं. अुलट तिचा घमेंडखोर स्वभाव अधिकच वाढूं लागला. प्रथम अुषा जन्मली; पण शालिनीच्या स्वभावांत मातृत्व प्राप्त झाल्यावरहि सात्त्विकपणा आणि सोशिकपणा आला नाहीं. आपल्याच संसाराच्या क्षुद्र आणि मर्यादित वर्तुळांत ती अधिकाधिक अुन्मादानें गिरक्या घेत राहिली. रमेश जन्मला. शालिनी तिशीच्या अुंबरठ्यावरून खालीं अुतरली. आतां तें चमत्कारिक वय सुरू झालें होतें कीं, ज्या वेळीं स्त्रीमध्यें अिष्ट बदल होणेंच आवश्यक

असतें. संथपणा आणि स्थिरता तिच्या अंगीं यावी लागते. न बोलतां सर्व कांहीं बोलून टाकण्याची आणि न सांगतां सारें समजून घेण्याची शक्ति तिला प्राप्त व्हावी लागते. नाहीं तर ... नाहीं तर मग जें व्हायचें तेंच होतें !

पण शालिनीला तें अुमजलें नाहीं. आपल्या अैन तारुण्याच्या काळांत आपण अेक श्रीमन्त, देखणा तरुण जिंकला ह्या सुखदायक कल्पनेंत ती अजूनहि मग्न होती. आतां तारुण्य सरलें होतें आणि धीरगंभीर प्रौढत्वाची सुरुवात होत होती; पण तिची घमेंड मात्र सरली नव्हती. तें सामर्थ्य अजूनहि आपल्यांत आहे, अेवढेंच नव्हे तर असले हजार राजाभाअू अजूनहि आपण हां हां म्हणतां जिंकून दाखवूं अेवढी प्रौढी मिरविण्याअितकी ती आतां अुन्मत्त झाली होती.

तिकडे तिशी सरल्यावर राजाभाअूचा अैन आत्मविश्वासाचा काळ सुरू झाला होता, तर तिकडे शालिनीचीं सारीं गर्वस्थळें पार पिचलीं होतीं, भंगलीं होतीं अन् तें तिला कळत नव्हतें. राजाभाअूच्यांत आणि आपल्यांत पडलेला फरक तिच्या लक्षांत आला नव्हता. आतां तिचीं कर्तव्यें बदललीं होतीं. आतां राजाभाअूच्या यशांत भागीदार होअून त्याच्या वैभवांत धन्यता मानण्याचा काळ आला होता. आतां तिनें समंजस वृत्तीनें आणि सहानुभूतीनें राजाभाअूला आकर्षून घेण्याची वेळ आली होती. राजाभाअूला आपल्या मुठींत ठेवण्याचीं साधनें आतां बदललीं पाहिजेत हें तिला मुळींसुद्धां समजलें नाहीं.

रमेश जन्मला, तिशी अुलटली; पण शालिनीला हें अुमगलें नाहीं. प्रौढत्वाला साजेशा भावना तिनें अुमगून घेतल्या नाहींत आणि मग खरोखरी व्हायचें तेंच झालें ! संसाराची घडी विस्कटली. जीवनाची रुचि बिघडून गेली. राजाभाअू आणि शालिनीमध्यें अंतर पडलें. हळूहळू तें वाढीला लागलें. जें अंतर पडलें तें तुटण्याअैवजीं शालिनीच्या वागणुकीमुळें तें अधिकच दुरावूं लागलें. तिची हुकमी तिरसट प्रवृत्ति राजाभाअूला जाचूं लागली. प्रत्येक गोष्ट आपल्या मनाप्रमाणेंच झाली पाहिजे हा तिचा हट्ट त्याला असह्य होअूं लागला. अेवढी कां हिची मिजास, अशी काय हिची लायकी ! असे विरोधाकडे झुकणारे विचार त्याच्या मनांत येअूं लागले आणि हट्टानें तोहि शालिनीचें म्हणणें बरोबर असलें तरी खोडून काढूं लागला, तिच्या अंगावर खेकसूं लागला, तिच्याकडे पहाण्याचें टाळूं लागला. तरीहि

शालिनीला वाटत होतें कीं, राजाभाऊ आपल्याच मुठींत आहे; पण अखेर अपेक्षाभंगानें तिला चांगलीच ठोकर दिली!

त्या नाताळच्या सुट्टीला तिच्याकडे बरीच पाहुणे मंडळी आली. तिची दिल्लीकडे स्थायिक झालेली मावशी आपल्या नवऱ्यासह आणि मुलामुलींसह तिच्याकडे चार दिवस मजेंत घालवायला आली. तिची सतरा-अठरा वर्षांची मावस-बहीण रेखा मोठी गोंडस होती. दिल्लीकडे राहिल्यामुळें तिच्या बोलण्यांत नी वागण्यांत अेक प्रकारचा औपचारिक, कृत्रिम तरी पण मोहक रेखीवपणा भरला होता. पंजाबी वेषांत मोठी आकर्षक दिसे ती. राजाभाऊला पहातांच ती अगदीं पाघळून गेली. दर वेळीं बाहेर जातांना ती राजाभाऊला आपल्याबरोबर ओढूं लागली. अेके दिवशीं शालिनी वरच्या सज्जांत कांहीं तरी वाळत टाकलें होतें तें खालीं आणायला पत्र्याचा डबा घेअून वर गेली, तों राजाभाऊ आणि रेखा अेकमेकांना खेंटून खिदळतांना तिला दिसलीं. राजाभाऊनें तिची पिंगट वेणी ओढली तेव्हां ती खोडकरपणें त्याला बुक्क्या मारीत अधिकच बिलगली.

शालिनी चमकून तशीच मागें फिरली. ज्या राजाभाऊनें पहिल्या भेटींत आपल्याला पसंत केलें त्याच राजाभाऊनें पहिल्या भेटींतच अेका नखरेल अुठवळ मैनेलाहि पसंत केलें? तिचें मस्तक भणाणूं लागलें. त्यानें तिलाच पसंत केलें आहे कीं आणखी कुणाला पसंत केलें आहे अशी शंका तिला डिवचून डिवचून चिडवूं लागली. पुढें रेखा गेली आणि तो दोन दिवसांचा खेळ तिथेंच खतम झाला; पण शालिनीला कठोर वस्तुस्थितिहि दाखवून गेला.

मग अधिकच चिडचीड, अधिकच तडफड, अधिकच जळफळ सुरू झाली. टोमण्यांना अगदीं अूत आला. कुजकटपणाची कमाल झाली. अितक्या अुशीरां शालिनीला सारें कांहीं समजलें; पण त्याचा कांहीं अेक अुपयोग होणार नव्हता. आतां ती राजाभाऊचे पाय हट्टानें ओढूं पहात होती; पण तो मागें न येतां तीच पुढें खेंचली जात होती. मनांत अभिमान असूनहि तीच आज लाचार बनली होती. त्याच्यासाठीं चहाची तयारी करीत होती. त्याला आवडणारे दहीं-वडे बनविणार होती!

'नवयुग'
२६ जानेवारी १९५२

★ ★ ★

## प्रायश्चित्त : : ११

गांवाबाहेर बंगला बांधल्यापासून वासुदेवकाकांचा आम्हांला सारखा आग्रह चालला होता कीं, अेकदां बंगल्यावर दोनतीन दिवस मुक्काम करायला या. तसे वासुकाका कांहीं आमचे सख्खे काका नव्हत. आम्ही आपले त्यांना काका म्हणत असूं; पण रक्ताच्या नात्यापेक्षां प्रेमाचें नातें श्रेष्ठ आहे म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. वासुकाकांचें आमच्यावर मुलखावेगळें प्रेम होतें. दर वेळेला काका आमच्याकडे बसायला आले म्हणजे बळेंच रागावून म्हणायचे, "अरे पोरांनो! मी अेवढा सत्रा वेळां टांग्याचा खर्च करून तुम्हांला पहायला येतों; पण तुम्हांला कांहीं माझा बंगला पहायची अिच्छा होत नाहीं ना? चालायचंच!'

शेवटीं मीं अेकदां ठरविलें कीं, आज काकांकडे रहायला जायचें. अंगावर कोट चढविला, सायकल बाहेर काढली आणि वेगानें जो निघालों तो वाटेंत कुठेंहि न थांबतां काकांच्या बंगल्यावर जाअून थडकलों. मला पाहतांच वासुकाकांना नि सत्यंकाकूंना प्रेमाचें भरतें आलें. काकूंनीं मला आवडणारे बटाटेपोहे करायला सुरुवात केली. काकांनीं मला दाखविण्यासाठीं जपून ठेवलेले 'अिलस्ट्रेटेड विकली' चे अंक कपाटावरून काढले. गप्पा करतां करतां मी काकांबरोबर बाहेरच्या व्हरांड्यांत आलों. अितका वेळपर्यंत शेजारच्या बंगल्याकडे माझें लक्षच गेलें नव्हतें.

जिकडून तिकडून हिरव्यागार केशरी फुलांच्या वेली चढवलेला तो दुमजली दगडी बंगला मावळत्या प्रकाशांत मोठा आकर्षक दिसत होता. त्याची बांधणी जुनी पण भक्कम होती. बंगल्याच्या आसपास चिटपांखरूं-

सुद्धां फिरकत नव्हतें. कुठलीहि हालचाल दृष्टोत्पत्तीला येत नव्हती. जरा वाऱ्याची झुळूक आली म्हणजे मात्र गळूं लागलेलीं पानें सळसळ करीत भिरभिरूं लागत. तेवढा आवाज काय तो बंगल्याभोंवतालच्या भयाण शांततेचा भंग करी.

त्या बंगल्याबद्दल मला अेकदम चमत्कारिक आकर्षण वाटलें. गूढतेच्या निळसर धुक्यामध्यें तो हळूहळू विरत चालल्याचा भास मला झाला. क्षणभर मला वाटलें, हा बंगला नसून केवळ काळोखानें भरून गेलेली ही एक खोलच खोल भयानक गुहा आहे. असें मला वाटतें न वाटतें तोंच कुणाची तरी धिप्पाड आकृति बंगल्याबाहेर पडली आणि पायांतले बूट कराकरा वाजवीत बाहेरच्या रस्त्यावर चालूं लागली. कुणा तरी भव्य पुरुषाची आकृति होती ती. त्यानें अंगांत पायांपर्यंत पोंचणारा लांब कोट घातला होता. त्याच्या खिशांत मजेनें हात अडकवून तो अैटीनें आणि धीमेपणानें अेकेक पाअूल टाकीत दूर दूर निघून गेला. अंधुक प्रकाशांत मला त्याचा चेहरा दिसला नाहीं; पण त्याचें शरीर चांगलेंच अुंच नि रुंद होतें. त्याचें मनांतल्या मनांत कौतुक करीत मी आंत आलों तोंच काकूनें पोहे खायला हांक देखील मारली.

पोह्यांतले खमंग बटाट्याचे तुकडे मटकावीत मीं काकूला विचारलें, " काकू, आपल्या शेजारच्या बंगल्यांत कोण रहातं ग ? " हातांतलें पोतेऱ्याचें फडकें रागानें झटकीत काकू म्हणाली, " नांव नको काढूंस मेल्याचं ! जिभेला किडे पडतील त्याचं नांव घेतलं तर ! "

" अग, पण तें काय आहे नांव तेवढं तरी सांग मला ! " मीं हंसत विचारलें. तेवढ्यांत काका शांतपणें उद्गारले, " अरे जाअूं दे, कशाला लोकांच्या पंचायती हव्यात आपल्याला ! जो करील तो भरील. आपण सरळ असलों म्हणजे झालं ! "

मला धड कांहींच समजेना; पण काकूकडून सगळी माहिती काढून घेण्यासाठीं मी स्वयंपाकघरांत तसाच रेंगाळत राहिलों. काका बाहेर गेल्यावर काकूच आपणहून मला हलकेच म्हणाली, " अरे, अगदीं दुष्ट मनुष्य आहे तो ! अगणित पैसा आहे त्याच्याजवळ; पण काय चाटायचं त्याच्या

श्रीमंतीला ! नाक नाहीं जाग्यावर मेल्याचं. माकड नाहीं तर ! अेवढी अप्सरे-सारखी सुंदर बायको मिळाली आहे; पण तिच्या मरणावर टपला आहे जसा ! आतां गेला असेल फिरायला, तिला कुलपांत बंद करून !"

"म्हणजे, तिला कोंडून हा फिरायला अेकटा जातो ?" मीं आश्चर्यानें विचारलें.

"अरे विचारूं नकोस तिचे हाल ! तिला घराबाहेर पडायची बंदी आहे. नखसुद्धां दिसत नाहीं तिचं कुणाला ! आतां आम्ही अेवढे शेजारीं राहतोंय ना, पण आम्हांला पंधरा पंधरा दिवस ती दृष्टीलासुद्धां पडत नाहीं. घरांत नोकर नाहीं कीं चाकर नाहीं. अेक जुना म्हातारा माळी तेवढा आहे. तीच बिचारी भांडीं घासते, धुणीं धुते, स्वयंपाक करते ! रूपानें म्हणशील तर लाखांत अेक आहे ! कापसासारखी नाजुक नि पांढरी आहे रे अगदीं ! कशी हरणीसारखी भोळीभाबडी आहे बिचारी ! बोटं कशीं नाजुक आहेत रे तिचीं ! अेकदां खिडकींत अुभी होती. मीं आपलं सहज पाहिलं; तर कशी गोड हंसली माझ्याकडे पाहून. तेवढ्यांत तो राक्षस आंतून खेंकसला. चिमणीअेवढं तोंड करून आंत पळाली बिचारी ! कशाला ह्या सैतानाच्या पदरीं पडली देवास ठाअूक ! काळा काळा ठिक्कर आहे मेला ! डोळे कसे लाल धुंद असतात जेव्हां पहावं तेव्हां ! धड नाहींत नाक कीं डोळे. नुसताच खाअून खाअून आडदांड माजला आहे ! मला तर असा राग येतो त्याचा ! वाटतं कीं, अुखळांत घालून कुटावा त्याला नि त्या गोड पोरीला आपल्याकडे आणून ठेवावं. अगदीं मुलीसारखं करीन मी तिचं सारं कांहीं !

"अेकदां मला वाटलं जाअूं दे. बिचारी कुठं येत जात नाहीं तर आपणच जाअून ओळख काढावी. चार पापड, कुरडया कारवोटीला घेअून मी तिच्या-कडे गेलें. हें माकड नव्हतं घरांत म्हणून बरं झालं ! सगळीकडून घर बंद करून गेला होता बाहेर. मी स्वयंपाकघराच्या खिडकीशीं गेलें. तिनं घाबऱ्या घाबऱ्या खिडकी अुघडली नी मला म्हणाली, 'कृपा करून तुम्ही अिकडे फिरकूंसुद्धां नका ! नाहीं तर आधींच माझे कमी हाल होताहेत त्यांत भर पडायची ! मला लागलं कांहीं तर मीच हांक मारीन !' तिनं खिडकीच पटकन् बंद करून टाकली. मी आपली आलें माघारीं. काय सुख मिळतंय त्या सैतानाला हिचे हाल करून तें त्याचं त्यालाच ठाअूक !

" हो, आणि मग अेकदां काय गंमत झाली. तो कुठं तरी बाहेरगांवीं गेला होता. माळ्याकडे कुलुपाची किल्ली देअून गेला. तिनं माळ्याशीं गोड गोड बोलून दार अुघडायला लावलं आणि मग हळूच माझ्याकडे आली. खूप खूप बोलत होती; पण स्वतःबद्दल कीं स्वतःच्या नवऱ्याबद्दल अेक शब्दहि बोलली नाहीं, बरं का! अुगीच आपल्या अिकडच्या तिकडच्या गप्पा करीत होती. बोलणं तरी असं मिठ्ठास आहे बघ तिचं!

" पण काय तिचं दुर्दैव पहा! ती दुसऱ्या दिवशीं अिकडं यायला आणि तें सोंग गांवाहून परतायला अेक गांठ पडली. टांग्याचा आवाज येतांच ती पांढरी फटफटीत पडली! थांबलीच नाहीं अिकडे क्षणभरसुद्धां. मग त्यानं अशी कांहीं बडवली तिला! गुरासारखी ओरडत होती रात्रभर. त्या माळ्यालाही बेदम चोप दिला! तो म्हाताराहि कण्हत होता रात्रभर! अेकदां तिला मारून टाकील तेव्हां त्याचा आत्मा शान्त होईल!"

त्या सुंदर स्त्रीच्या अमानुष छळाची कहाणी काकूच्या तोंडून अैकतां अैकतां माझ्या अंगावर कांटा अुभा राहिला! अुगीच कांहीं तरी बोलायचें म्हणून खिन्नपणानें मी काकूला म्हणालों, " अितके दिवस तरी ही जिवन्त कशी राहिली हें आश्चर्यच आहे मोठं!"

काकू सर्र्कन् वळून म्हणाली, " वा! तसा तिला तो फार जपतोहि! जरा आजारी पडली तर डॉक्टरला स्वतः घरीं घेअून येतो. अेकदां तिला अेकाअेकीं फार अुलट्या सुरू झाल्या तर घाबऱ्या घाबऱ्या यांच्याकडे आला. मग मीच जाअून तिला आलं-लिंबू चाटवलं. असं दाखवत होता, कीं किती जपतों आहे मी बायकोला. काय भ्याला होता पण! घर म्हणशील तर असं कांहीं सुंदर ठेवलंय! तसं खाणंपिणंसुद्धां चांगलं असावं त्याचं; पण छळायची ती छळतोच तिला! काय त्याचं गूढ आहे कांहीं समजतच नाहीं आपल्याला!

रात्रीं जेवणें आटोपल्यावर मी अंथरुणावर पडलों, तरी त्या माणसाचा विचार कांहीं माझ्या डोक्यांतून जाअीना. लांब कोट घालून धीमेपणानें चालणारी त्याची धिप्पाड आकृति अुजळून अुजळून माझ्या डोळ्यांसमोर अुभी राहिली. त्याचा विचार करतां करतां माझा अचानक डोळा लागला. मग मी जागा झालों तो अेका भयंकर मोठ्या किंकाळीनेंच! मी खडबडून

जागा झालों नी धांवतच खिडकीजवळ गेलों. शेजारच्या बंगल्यांत अंधार होता. फक्त मधल्याच कुठल्या तरी खोलींत तांबडा दिवा लावला होता नि त्याचे तांबूस किरण बाहेरच्या अंधाराला अधिकच भेसूर स्वरूप देत होते. थोड्याच वेळानें परत दुसरी किंकाळी अैकूं आली आणि मग मोठमोठ्यानें स्फुंदण्याचा आवाजहि कानीं पडला. नक्की तीच स्त्री रडत होती. मग तो खेकसला, 'गप्प रहा! अेक शब्द तोंडांतून काढशील तर मुस्काट फोडीन!' त्याचे ते घोगरे पुरुषी शब्द किती तरी वेळ चहूं बाजूंना घुमत राहिले. थोडा वेळ सारें कांहीं शांत झालें तोंच परत तिनें किंकाळी फोडली आणि ती अधिकच आर्तपणें स्फुंदूं लागली.

मला तिचे ते करुण नी केविलवाणे स्वर अैकवेनात. धांवतच मी काकांच्या खोलीकडे गेलों नी दाराची कडी खडखडवीत ओरडलों, 'काका, काका, तिला वांचवा हो! तो तिचा खूनच करीत आहे नक्की! अुठा ना काका!' चटकन् अुठून काका बाहेर आले नि मला थोपटीत म्हणाले, 'अरे, रोजचंच आहे तें. तूं मुकाट्यानं झोंप पाहूं. आम्हांला आतां संवयच झाली आहे त्याची. जा पाहूं आपल्या खोलींत!'

मी नाअिलाजानें परत फिरलों. किती तरी वेळ ती स्त्री भेसूर आवाज काढून रडत होती. मधूनच तो दुष्ट मनुष्य तिच्यावर खेंकसत होता. ती सारी रात्र मीं बिछान्यावर तळमळूनच काढली. मध्येंच डुकली लागे नी मी दचकून जागा होअीं तोंच तिचें भेसूर रडणें अैकूं येअी. अखेर पहांटेला मला डोळा लागला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं अुठतांच माझ्या मनाला विलक्षण खिन्नता आली. काका अजून अुठले नव्हते तोंवर जरा मोकळ्या हवेंत फिरून यावें म्हणून मी बाहेर पडलों. रहदारीचा रस्ता सोडून मीं बाजूची पायवाट धरली आणि मैदानामधल्या चिमुकल्या टेकडीकडे निघालों. टेकडी चढतां चढतां माझ्या नाकांत अेकदम सिगरेटचा चटकदार सुवास शिरला. त्या टेकडीच्या आसपास नक्की कुणी तरी पुरुष माणूस होतें. मीं टेकडीच्या माथ्यावर जाअून पलीकडे डोकावलें. अेका दगडावर तो स्तब्ध बसला होता नि त्याच्या हातांतली सिगरेट तशीच जळून चालली होती. तोच तो लांब निळा कोट त्याच्या अंगावर चढवलेला होता. पलीकडे खळखळून वाहणाऱ्या निर्झरावर दृष्टि

लावून तो शान्तपणें बसला होता. अेकूण थोडासा ‘कवि’ पण होता तर तो! मला हंसूं आलें. त्यानें दचकून मागें पाहिलें. मला पहातांच तो कांहीं चरकला नाहीं. अुलट प्रसन्नपणें हंसून म्हणाला, ‘या, या, बसा ना अिकडे या दगडावर!’ मी शेजारीं जाअून बसलों. ‘तुम्ही आमच्या शेजारीं पाहुणे म्हणून रहायला आला आहांत ना? मीं पाहिलं तुम्हांला काल सायकल-वरून येतांना. वासुकाका तुमचे कोण लागतात?’ तो मोकळेपणानें बडबडूं लागला.

सकाळच्या स्वच्छ प्रकाशांत मला त्याचा चेहरा स्पष्टपणें दिसला. खरोखरीच तो अगदीं कुरूप होता, काळा होता. त्याच्या चेहऱ्यांत मला अेकच गोष्ट आकर्षक वाटली आणि ती म्हणजे त्याचें भव्य तकतकीत कपाळ! तें कपाळ त्याच्या बुद्धिमत्तेची नी औदार्याची साक्ष देणारें होतें. हा असला दुष्ट माणूसघाण्या मनुष्य नी अुदार? मला माझ्या कल्पनेचेंच हंसूं आलें.

तो खूप अुल्हासानें मला अेकेक प्रश्न विचारीत होता नी मी त्याला अुत्तर देत होतों. बोलतां बोलतां माझी त्याच्याविषयींची कल्पना हळूहळू बदलूं लागली. त्याच्या बोलण्यावरून तर तो फारच प्रेमळ नी आनंदी वाटत होता. ह्याच माणसानें काल आपल्या बायकोला अितका आकान्त करायला लावला हें मला खरेंच वाटेना. किती मिठ्ठास वाणी होती त्याची! हा आपल्या बायकोवर अितक्या तिरसटपणें खेंकसूं शकतो? छेः! मला खरेंच वाटेना. त्याचें व्यक्तिमत्त्व, तो कुरूप असूनहि नक्कीच आकर्षक होतें. कारण हळूहळू मी त्याच्याकडे किती ओढला जात होतों! माझ्या मनांत त्याच्याबद्दल प्रेम आणि आदर अुत्पन्न होअूं लागला होता.

बोलतां बोलतां तो म्हणाला, ‘वसंतऋतु सुरू झाला म्हणजे अिकडे पोपटांचे थवेच्या थवे येतात. मला तसे स्वतंत्रपणें भराऱ्या मारणारे अुन्मत्त पोपटच आवडतात. पिंजऱ्यांत कोंडलेला पोपट पाहून मनाला कसं अुदास वाटतं नाहीं?’

त्याचें तें बोलणें विसंगत वाटून मी चमत्कारिकपणें हंसलों. त्यानें चमकून विचारलें, ‘कां, हंसलांतसे? माझं बोलणं कांहीं चुकलं का?’ मीं सगळें धैर्य अेकवटून म्हटलें, ‘मी बोललों तर माफ कराल का? पण तुमच्या तोंडीं हें बोलणं शोभत नाहीं. पिंजऱ्यांत कोंडलेला पोपट तुम्हांला

आवडत नाहीं; पण घरांत चोवीस तास कोंडलेली नि कुढणारी बायको मात्र आवडते काय?'

तो अेकदम गंभीर झाला! त्याचा चेहरा खळबळून निघाला. त्याच्या डोळ्यांत टचकन् पाणी तरारून आलें नि त्याच्या पापण्या थरथरूं लागल्या. किती तरी वेळ तो शान्तच राहिला. शेवटीं निश्चयानें तो बोलूं लागला, 'योग्यच प्रश्न विचारलात तुम्हीं मला! आजवर अितक्या धीटपणानं असा रोखठोक सवाल कुणीं केलाच नव्हता! मींहि जगापुढं माझी तरफदारी करण्याचा प्रयत्न कधीं केला नाहीं. करायचंय काय मला जगाशीं सौदा करून? मरेनात का सारे जण. मला काय त्याचं! माझ्या बायकोचे हाल लोकांना दिसतात; पण माझे हाल मात्र कुणाच्या खिजगणतींतहि नाहींत. तुम्हांला वाटेल हा चांगला खातो, फिरतो; हाल सोसते ह्याची बायको! आणि याला रडायला नि कांगावा करायला काय झालं?'

'जरा धीर धराल नि माझे चार शब्द अैकून घ्याल तर तुम्हीहि म्हणाल कीं, यानं जें दुःख सोसलं त्यापुढं त्याच्या बायकोचं दुःख कांहींच नाहीं! मी कदाचित् अतिशयोक्तीहि करीत असेन; पण तसा प्रत्येक मनुष्यच करतो, मग मीं तरी कां करूं नये? अेके काळीं मी असा बेपर्वाअीनं बोलणारा नि वागणारा माणूस नव्हतों. फार फार निराळा होतों मी पूर्वी; पण परिस्थितीनं माझा आज दगड बनविला आहे. माझ्या काळजाचा तिनं अगदीं फत्तर करून टाकला आहे. मला हें सारं कळतं, समजतं! पण मी अस्साच वागणार! चार दिवस तिचे झाले; आतां अुरलेले माझे!

'बरोबर अकरा वर्षांपूर्वी माझे वडील वारले आणि या जगांत मी अगदीं अेकटा अेकटा अुरलों. आअी तर लहानपणींच मला बाबांच्या कुशींत टाकून चालती झाली होती; पण आअीची अुणीव कधींहि भासूं न देतां बाबांनीं मला लहानाचं मोठं केलं. ते वारल्यानंतर मला कुणाचाहि आधार अुरला नाहीं. पोटाची काळजी नव्हती. स्वतःच्या मालकीचा अेक बंगला आणि गडगंज संपत्ति मागं ठेअून ते गेले! माझं शिक्षणहि पुरं झालं होतं. मी वयानं चांगला तरुण म्हणजे बावीस-तेवीस वर्षांचा होतों.

'वास्तविक पहातां दुसऱ्या अेखाद्या माणसाला यापेक्षां अधिक स्वातंत्र्य आणि सुख कधीं मिळालंहि नसेल! दुसऱ्या कुणाला या परिस्थितींत काय

करूं नि काय नको असं झालं असतं; पण मी मात्र अगदीं भांबावल्यासारखा झालों होतों. माझ्या संपत्तीवर नजर ठेवून भोंवतालीं गोळा झालेल्या स्वार्थी जनावरांची मला अत्यन्त चीड येअी. जो तो खोटं हास्य तोंडावर आणून माझ्या पायांपाशीं धांवत येअी. खोटी स्तुति, खोटं प्रेम! माझं मन जगाला अगदीं कंटाळून गेलं. त्यांतून माझं रूप असं असल्यानं मला अेक प्रकारचा न्यूनगंड वाटे. चांगले चांगले कपडे अंगावर घातल्यानंतर मला अभिमान वाटण्याअैवजीं शरम वाटूं लागे. मला कांहींच शोभत नाहीं हें सारं असं वाटून माझ्या काळजांत कालवाकालव होअी. उंची पोषाख करून आणि अुत्तम अत्तर फांसून मी कुठं समारंभाला गेलों म्हणजे सारे लोक माझ्याभोंवतीं माश्यासारखे घोंघावत गोळा होत. कुणी म्हणे, 'वाः, काय झक्क दिसतां आहांत तुम्ही आज!' पण मला मात्र संकोचल्यासारखं होअी!

'त्यांतून स्त्रिया जवळ आल्या म्हणजे तर मला आणखीनच भीति वाटे. आपला कुरूप चेहरा कुठल्याच स्त्रीला आवडणार नाहीं ह्या भयानं मी मानच खालीं घालीं; पण नेमक्या स्त्रियाच माझ्याभोंवतीं गर्दी करीत! कित्येक सुंदर तरुण मुली माझा स्नेह संपादन करण्याचा प्रयत्न करीत; पण मला माहीत होतं कीं, हें आकर्षण माझ्याबद्दल नसून माझ्या पैशाबद्दल आहे, माझ्या सुंदर बंगल्याबद्दल आहे. समजा, मी गरीब असतों तर माझ्या कुरूपपणाकडे कुणीं तरी डोळेझांक केली असती काय? मला असलं प्रेम नको होतं. अैन तारुण्यांत अितकं स्वातंत्र्य लाभलं असूनहि मला कुठल्याच मुलीबद्दल आकर्षण वाटत नसे. अशाच मुलीवर प्रेम करण्याची माझी अिच्छा होती कीं, जिला मोह वाटेल पण तो माझ्या स्वतःबद्दलचा; जिला ओढ लागेल पण ती माझ्या सहवासाची! केवळ सोन्याला भुलणारी स्त्री मला नको होती आणि अशी स्त्री मला मिळणं अशक्यच होतं! म्हणूनच या जन्मीं तरी आपल्याला शुद्ध नि अुत्कट स्त्रीप्रेमाचा लाभ होणं अशक्य आहे हें मी धरूनच चाललों होतों. त्या कल्पनेमुळं मला अतिशय अुदास वाटे. घरामध्यें नोकराचाकरांची नि नातेवाअिकांची अेवढी वर्दळ असूनहि मी अेकटा अेकटा होतों. मोठमोठ्या उद्योगधंद्यांत बाबांनीं पैसे गुंतवून ठेवले होते त्यांपासून येणारी प्राप्ति दिवसेंदिवस वाढत होती; पण मला त्याचा मुळींसुद्धां आनंद होत नसे. जिवन्त मरणाच्या यातना मी पळापळाला भोगीत होतों!

" अखेर असा अेक दिवस आला आणि मला वाटलं कीं, आतां माझं भाग्य फळाला येणार! त्या दिवशीं संध्याकाळीं मी फिरून येत होतों. अितक्यांत अंधारांतून कुणी तरी धांवत आलं आणि माझ्या पायांना घट्ट मिठी मारून ओक्साबोक्शीं रडूं लागलं. मी घाबरून मागं सरलों. ती अेक तरुण मुलगी होती. ती कांहीं केल्या माझे पायच सोडीना. मीं अखेर तिला विचारलं, " बाअी, कोण आहांत तुम्ही? काय पाहिजे तुम्हांला?" तेव्हां आपला चेहरा वर अुचलून ती म्हणाली, " आम्ही फार संकटांत आहोंत. आमच्या घरावर अुद्यां जप्ती येणार आहे. माझ्या वडलांना भयंकर कर्ज झालं आहे. मला मदत करण्याचं वचन देत असाल तर हे पाय सोडतें!" मी तिच्या चेहऱ्याकडे निरखून पहात होतों. ती नक्कीच विलक्षण सुंदर होती. कारण अितक्या अंधारांतहि तिच्या चेहऱ्याच्या रेखीव कडा अुजळून राहिल्या होत्या. मीं विचारलं, 'तुम्हांला कसं माहीत झालं मी कोण आहे तें?' शरमून मान खालीं घालून ती म्हणाली, 'आपलं नांव कुणाला माहीत नाहीं बरं? आपल्या अुदार स्वभावाची कीर्ति अैकूनच मी आपले पाय धरायला धांवत आलें!' मीं विरघळून जाअून तिला मदत करायचं कबूल केलं; पण ती माझ्याबरोबर घरीं आली नाहीं! अमुक ठिकाणीं मी अुभी राहीन तिथं पैसे पोंचते करा असं तिनं सांगितलं. मी ताबडतोब रक्कम घेअून स्वतः गेलों. रस्त्यावरच्या दिव्याच्या प्रकाशांत तिचा चेहरा मला स्पष्टपणें दिसला. खरोखरीच ती अतीव देखणी होती! ती नुसतीच सुंदर नाहीं तर मानीहि दिसली. केवळ गरज आहे म्हणूनच मी तुमच्या पायांशीं आलें, नाहीं तर पैशाची मला पर्वाहि नाहीं असा आविर्भाव माझ्या हातून पैसे घेतांना तिच्या चेहऱ्यावर चमकला. तिच्या तपकिरी डोळ्यांत खिन्नतेचं पाणी दाटलं होतं. मी तिच्यावर अेकदम मोहित झालों. अशीच अशीच तडफदार स्त्री मला हवी होती. माझ्याकडे ती माझ्या औदार्याची कीर्ति अैकून आली होती, माझ्या संपत्तीचा नांवलौकिक अैकून नव्हे तर! मी तिला नांवगांव, पत्ता वगैरे माहिती विचारूं लागलों; परंतु तिनं साफ नकार दिला! माझे घाअीघाअीनं आभार मानून ती अंधारांत चालतीहि झाली, पण माझ्या जिवाला चटका लावून गेली!

" तिची मला वारंवार आठवण येअी; पण ती परत कित्येक दिवस कुठं दिसलीहि नाहीं. मी तिच्या शोधार्थ वेड्यासारखा गल्लीन् गल्ली धुंडत फिरत

असे. अखेर अेकदां ती मला दिसली. अेकदां मी बाजारांतून मजेनं फिरत होतों. अेका कांचेच्या कपाटांत टांगलेलं कोटाचं कापड पहात मी उभा होतों. अितक्यांत कुणीं तरी माझ्या दंडाला पाठीमागून नाजुक पण अर्थपूर्ण स्पर्श केला. मीं मागं वळून पाहिलं तों अेखाद्या सुंदर चित्रासारखी ती स्तब्ध अुभी होती. ‘ तुमच्याशीं कांहीं काम आहे ! ’ ती जड आवाजांत बोलली. ‘ आपण कुठं तरी बाजूला जाअूं या. ’ मी तिला अेका मोठ्या हॉटेलांत घेअून गेलों. आंत शिरतांना ती संकोचली होती. कारण हॉटेलामध्यें अुंची पोषाख करून आलेली मंडळी होती आणि तिच्या अंगावर अगदीं मळलेलं, सत्रा ठिकाणीं शिवलेलं पातळ होतं.

“ तिला परत पैशाची गरज लागली होती. मीं तिला म्हटलं, ‘ मी तुम्हांला वाटेल तें देअीन, पण तुम्ही माझ्याशीं स्नेहसंबंध ठेवला पाहिजे ! ’ पण तिनं तें नाकारलं. भिअून ती अुठून जाअूं लागली. शेवटीं नाअिलाजानं मीं तिला पैसे दिले. अशीच ती मला अचानक भेटे, पैसे मागे आणि अदृश्य होअी ; पण हळूहळू तिला माझ्याबद्दल ओढा वाटूं लागला होता. निदान त्या वेळीं मला तरी तसं वाटलं. ती माझ्या प्रकृतीची चौकशी करी. माझ्या-बद्दल अपरंपार कृतज्ञता दाखवी ; पण माझ्याशीं जास्त ओळख ठेवण्याची अिच्छा मात्र दाखवीत नसे. मींहि तिच्यावर जबरदस्ती केली नाहीं. तिला वेळोवेळीं वाटेल त्या रकमा खुषीनं दिल्या. त्याबदली मीं तिच्याकडून कशाकशाचीहि अपेक्षा केली नाहीं. खरोखरीच शुद्ध माणुसकीखेरीज माझ्या अंतःकरणांत कसलीहि भावना नव्हती. तिच्याबद्दल मला अत्यन्त प्रेम वाटत होतं ; पण तेंहि मीं दाबून ठेवलं. तिच्या अिच्छेविरुद्ध मी चुकूनहि गेलों नाहीं.

“ अेकदां मला कल्पना नसतांना अचानक ती घरीं आली. थेट माझ्या खोलींत शिरली आणि पहिल्यासारखेच तिनं माझे पाय धरले. या वेळीं ती निराळीच विनंति करायला आली होती. ‘ मला पदरांत घ्या ! ’ असे शब्द तिनं अुच्चारले. मीं तिला विचार बदलण्याची संधिहि दिली. मीं म्हटलं, ‘ माझी हरकत नाहीं. अुलट त्यापेक्षां अधिक आनंदाची गोष्ट कुठची असेल ? पण कुठल्याहि दडपणाखालीं तुम्ही हें करीत असाल तर मी तुम्हांला विचार

बदलण्याची मोकळीक देतों!' पण तिनं सांगितलं, 'नाहीं, मी आपखुषीनं आलें आहें. तुमच्यावरील प्रेमानं ओढून मला अिथं आणलं आहे!' मग मीं तिला संमतिहि दिली; पण तिनं गुपचुप लग्न लावण्याची अिच्छा प्रदर्शित केली. कारण तिच्या घरीं कुणाचीहि संमति नव्हती. अुलट घरच्या मंडळींनीं तिचं दुसऱ्याच कुणा तरी नीच माणसाशीं लग्न ठरविलं होतं. घरांतला छळ असह्य होअून ती अखेर माझ्या पायांपाशीं धांवत आली होती.

"आम्हीं ताबडतोब परगांवीं जाअूनच लग्न लावलं. तिच्या म्हणण्याप्रमाणें जवळजवळ दोन वर्षं आम्ही बाहेरगांवींच हिंडत राहिलों. मला वाटलं मी खरोखरीच सुखी झालों. खरोखर मीं तिच्यावर अलोट प्रेम केलं. तिनं मागितलं आणि मीं दिलं नाहीं असं कधीं झालंच नाहीं! तिच्या रेशमी केसांवरून हात फिरवितांना मला वाटे, जीवनहि असंच सुंदर, सुखावह आहे! तिच्यावरील प्रेमानं मी आंधळा झालों होतों. म्हणूनच मला वाटलं कीं, तिचंहि माझ्यावर प्रेम आहे. तिच्या प्रत्येक शब्दावर माझा विश्वास होता. ती जें सांगे तें मी अैकत असें. जें सांगण्याची तिची अिच्छा नव्हती तें अैकण्याचा हट्ट मीं कधींहि धरला नाहीं. तिला वाटेल तें करण्याचा हक्क मीं दिला होता. तिनं कुठलीहि वस्तु अुचलून कुणालाहि दिली तरी मला त्याचं कौतुकच वाटे! प्रेमाला भुकेलेलं माझं अंतःकरण तिचा थारा मिळतांच पुरेपूर विसांवलं!

"किती आनंदानं मी तिला घेअून परत बंगल्यावर आलों! रेशमी कापडाचा तागा सटसट अुलगडत जावा तसं आयुष्य अगदीं सुखानं चाललं होतं; पण अखेर दैवानं मला चांगलाच धक्का दिला!

"अेकदां दुकानांतून कांहीं तरी खरेदी करून आम्ही बाहेर येत होतों. मी तिच्या हातांत हात अडकवून दुकानाच्या पायऱ्या अुतरत होतों. अितक्यांत घाबऱ्या घाबऱ्या माझा हात हिसडून ती दुकानांत अुलटी पळाली! मला धक्का देअून अेक मनुष्य दडदडा तिच्यामागें धांवत गेला. मी चकित होअून सारा देखावा पहात होतों. त्या माणसानं तिला कांहीं सांगतांच ती मुकाट्यानं त्याच्या मागून चालूं लागली. माझ्याजवळ येतांच ती शरमून थांबली आणि मला म्हणाली, 'मी थोड्याच वेळांत घरीं परत येतें. तुम्ही जा!' त्याबरोबर तो मनुष्य विकटपणें हंसून म्हणाला, 'मग तुझ्याच घरीं

येतों कीं मी.' 'माझ्या गरिबाच्या झोंपडींत कशाला?' मी तर अगदींच भांबावलों होतों. आगन्तुकपणें तो मनुष्य आमच्या मोटारींत येअून बसला आणि आमच्या खांद्याला खांदा लावून घरीं शिरला!

"घरीं येतांच ती आंतच पळाली! आमच्या वाऱ्यालासुद्धां ती अुभी राहिली नाहीं! तो मला म्हणाला, 'कुठं गांठलंन् हिनं तुम्हांला?' मला त्याची अुर्मट आणि हलकट भाषा मुळींच आवडली नाहीं. मी त्याचा दंड पकडून त्याच्या अंगावर खेंकसूं लागलों; पण तो शान्त होता. हळूहळू त्यानं सर्व हकीगत सांगितली आणि माझे डोळे चांगलेच अुघडले. माझ्या नशिबाला आलेली स्त्री अेक लुच्ची, स्वार्थी आणि लोभी बाअी होती. केवळ पैशासाठीं ती काय वाटेल तें धाडस करणारी होती. आपल्या आअीबापांशीं भांडण करून ती या हलकट माणसाचा हात धरून पळाली होती. कां तर त्या वेळीं याच्याजवळ जरा बरा पैका होता. पैशासाठीं ती त्याच्याशीं दररोज भांडण करी. तो पण म्हणे, 'तूं थोडीच माझ्या लग्नाची बायको आहेस कीं, मी तुझे नवे नवे हट्ट पूरवूं?' ज्या वेळीं ती माझे पाय धरायला येअी त्या वेळीं तिच्या बापाला कर्ज नव्हतं. तिच्या घरावर जप्ती येणार नव्हती तर हा माणूस तिला पैसे देत नव्हता म्हणून ती माझ्याकडून रकमा घेअून जाअी. त्यालाहि हें माहीत नव्हतं. त्या वेळीं तो कर्जानं बेजार झाला होता! अेके दिवशीं ही त्याच्याकडून पळाली आणि कुठं तरी अेकटीच खोली घेअून राहिली; पण त्यानं तिला परत आणली. नंतर ती माझ्याकडे आली आणि खुबीनं माझ्याकडून तिनं लग्नाला संमति मिळविली.

"तो माणूस जरी मवाली होता तरी मोठा समंजस दिसला. कारण माझ्या संसारांत ढवळाढवळ करण्याची त्याची अिच्छा दिसली नाहीं. मीं त्याला चांगलीशी नोकरी पाहून देण्याचं वचन दिलं. तो मुकाट्यानं अुठून गेला. आतां तो चांगला मार्गाला लागला आहे.

"त्या वेळेपासून माझा संसार बिघडला तो बिघडलाच! मी संतापून तिला आडवेतिडवे प्रश्न करूं लागलों; पण ती मुखस्तंभासारखी गप्पच होती. अखेर अुसळून ती म्हणाली, 'हो, हो! केली मीं तुमची फसवणूक! पहिल्यापासूनच मी तुमच्याशीं खोटं बोलत आलें, प्रेमाचं नाटक करीत आलें. तुमच्याकडे पैसा नसता तर तुमचं हें वेडंविद्रं तोंड सुद्धां पाहिलं नसतं

कधीं! पैशासाठीं कोण काय करणार नाहीं? मला कशाला बोलतां? मी कां म्हणून दारिद्य सहन करूं? कशासाठीं अुपासतापास काढूं? माझ्या आअी-बापांनीं कधीं मला पोटभर जेअूं घातलं नाहीं, कीं माझे चुकून लाड पुरवले नाहींत! पैशासाठीं मी घरांतून पळून गेलें; पण त्या नादान माणसानंहि माझे हाल केले! नाहीं तर मी तुमच्याकडे कशाला आलें असतें? मला मुळापासूनच चैनीची आवड आहे. कां म्हणून मी माझी हौस पुरी करूं नको? ती फडाफडा बोलत होती. किती क्रूर आणि कपटी दिसत होती ती! त्या क्षणापासून मला तिचा अत्यंत तिटकारा वाटूं लागला. मीं तिला सांगितलं, 'तुला चैन हवी ना? कपडालत्ता हवा ना? खुशाल घे! पण त्यासाठीं तुला या घरांत कष्ट करावे लागतील. श्रम करशील तर त्याची किंमत देईन! तेव्हांपासून मीं तिला कामाला लावली. घरांतले नोकरचाकर काढून टाकले. तिचं नटूनथटून गांवभर भटकणं अजीबात बंद केलं. घराच्या मर्यादित चौकटींत तिला वाटेल तें करण्याची परवानगी आहे; पण बाहेर... अं हं! पाअूल सुद्धां टाकूं देणार नाहीं!"

त्यानें बोलणें थांबाविलें आणि सिगरेट पेटाविली. मला कांहीं तरी बोलावयाचें होतें; परंतु तें मला बोलावेंसेंच वाटेना आणि तोहि तें अैकेल अशी खात्री पटेना. आम्ही अुठलों आणि निःशब्दपणें घराची वाट चालूं लागलों. त्याचा बंगला येतांच तो आंत शिरला. मीहि पुढें चालूं लागलों.

त्यानंतर मी वासुकाकांच्याकडे परत चुकूनहि गेलों नाहीं. त्याबद्दल त्यांचा माझ्यावर फार राग आहे.

